# संराक ”

लेखकः—

संतुराम रामकृष्ण कर्णिक

१९३४

किंमत एक रुपाया.




**रावबहादूर डी. एम्. भोंसले,**

चीफ सेक्रेटरी.

टु हिज हायनेस, दि महाराजा ऑफ कोल्हापूर.

रावबहादूर

दत्ताजीराव माधवराव भोंसले

यांस

आदरपूर्वक अर्पण.

# परिचय



विविधवृत्त व तुतारी हीं वर्तमानपत्रें उदयास आल्यानंतर लौकरच त्यांत संराक या सहीनें सुंदर विनोदी कविता वाचावयास मिळूं लागल्या. या कवितांतील अभिनव भाषापद्धति आणि विशिष्ट प्रकारचा विनोद यांच्या योगानें त्या मला इतक्या प्रिय झाल्या कीं संराकाचें खरें नांव व पत्ता मिळवून त्याचा परिचय करून घेण्याचें मीं ठरविलें. १९३१ सालीं माझा मुक्काम पुण्यास असतांना संराक यांनी मला कळविलें कीं आपण कोल्हापुराहून मुंबईस जात आहों व अमुक दिवशीं सकाळीं पुणे स्टेशनावर तुम्ही आपणास भेटावयास यावें. त्याप्रमाणें मोठ्या उत्सुकतने मुबइ मेलच्या वेळेवर मी स्टेशनवर गेलों; परंतु त्यावेळीं भेटीचा योग आला नाहीं त्यानंतर मला इतकेंच कळालें कीं, संराक यांचें खरें नाव सतुराम रामकृष्ण कार्णिक असें आहे. व त्यांचें वास्तव्य कोल्हापूर येथे आहे. माझ्या स्वतःच्या अजाणत्या विनोदाचे जे अगदीं थोडे चाहते आहेत त्यांपैकीं रा. कर्णिक हे असल्यानें त्यांचा भेट घेण्याची मला वाटत असणारी उत्सुकता १९३२ च्या नाताळांत कोल्हापुरच्या साहित्य संमेलन प्रसंगी पूर्ण झाली. माझ्या उतान्याच्या जागीं संराक वाट पहात आहेत असा निरोप आल्यावरून मी घाईनें उतान्यावर परत आलों. संराक हे कवि असल्यानें त्यांचें एक मानसिक चित्र मनःचक्षुपुढें उभें केलें होतें. काळा सावळी, रोडकी अशी देहयष्टि, चारचार बोटें वाढलेले केस, डोळ्यांना मोठ्या नंबरचा चष्मा, अंगांत छाती उघडी ठेवणारा सदरा, त्यांतून डोकावणाऱ्या बरगड्या, अशा प्रकारची मूर्ति नजरेस पडेल असें मला वाटले होतें. परंतु तिच्या ऐवजीं अप टु डेट् युरोपिअन् पोषाख केलेला पाणीदार डोळ्यांचा, १६० रत्तल वजनाचा एक गृहस्थ माझी मार्गप्रतीक्षा

करीत असलेला पाहून हा संराकचा एकादा सरदारशिष्य असेल असें मी तर्किलें. परंतु आपणच संराक आहों असें त्या भव्य तरुणानें सांगतांच, 'कवि असूनहि तुम्ही फार चांगले दिसतां!' असे उद्गार माझ्या तोंडून बाहेर पडले. संराक या व्यक्तीचा अधिक परिचय करून देण्याचें कारण मला वाटत नाहीं. कवि या नात्यानें त्यांची ओळख या पुस्तकाच्या योगानें वाचकांस पटेलच. तत्पूर्वी ती वाचण्याची दिशा कशी असावी यासंबंधीं चार विचार येथें मांडितों.

विनोदी कविता हें शब्दयुग्म ठेंगणें आकाश, शीतल अग्नि किंवा दुःखी विदूषक या जोड्यांप्रमाणेंच विरोधमय भासण्याचा संभव आहे. विनोदी लेखक छिद्रान्वेषी तर कविता रचणारा गुणान्वेषी असतो. विनोद कुरूपता शोधून काढून जगापुढें मांडितो तर काव्य सौंदर्याचेंच दर्शन देतें. जगांतील संवादित्व, एकनिष्ठता, एकतानता यांवर कविता देवीचें अधिष्ठान असतें तर विसंवादित्व, चित्तव्यग्रता, कोलाहल यांचा जेथें भर तेथें विनोदपिते नारदमुनि यांचें वास्तव्य असतें. वास्तविक शब्दब्रह्माचीं हीं दोन अपत्यें एकमेकांचीं भावंडेंच होत; परंतु त्यांच्या स्वभावांत आणि वसतिस्थानांत फारच मोठें अंतर आहे.

काव्य हें भावनामय असल्यानें हृदयास तर विनोद विचारजन्य असल्यानें बुद्धीस संवेद्य असतो. विनोदांतहि भावनेचा अंश मुळींच नसतो असें नाहीं; परंतु सहानुभूतीपेक्षां परदोषसंशोधनावर त्याची अधिक मदार असते. प्रेमीजनांबद्दल कळकळीचे उद्गार काढून लैला आणि मजनू किंवा छेलबटाऊ आणि मोहनाराणी यांस जनतेच्या हृदयसिंहासनावर कवि नेऊन बसवील. परंतु त्याच जोडप्यांच्या विलापांस एखाद्या विनोदपुंगवाच्या तडाक्यांत सांपडूं द्या कीं लगेच तो त्याना वेड्यांत काढून जनतेकडून त्यांजवर धोंड्यांचा वर्षाव करविल्यावांचून राहणार नाहीं!

आतां विनोदी कवीच्या अंगांत वरील दोन्ही प्रकारचे गुण वसत असले पाहिजे हें उघड आहे. जेवढें तिरस्करणीय असेल तेवढ्यावरच उप-

हासाच्या शस्त्राचा प्रहार करावयाचा आणि जे वंद्य असेल त्याच्या गळ्यांत काव्यहार घालावयाचा अशी वृत्ति ज्याच्या अंगीं असेल तोच विनोदी कवि होय. समोर दिसेल त्याचा सरसकट उपहास करणारा 'विनोदी' असला तरी 'कवि' खास नव्हे. संराक यांच्या कवितेंत स्पृहणीयांचें विडम्बन किंवा गर्हणीयांची प्रशंसा यांस थारा मिळाला नाहीं असें त्यांच्या कृताच्या अवलोकनावरून दिसून येतें.

मध्यंतरी महाराष्ट्रांत लोकप्रिय झालेल्या व रानोमाळ माजलेल्या विडम्बन काव्यपद्धतीबद्दल संराक यांचें मत फारच प्रतिकूल झालेलें 'कवि आणि मरण' या कवितेवरून दिसतें. विडम्बन काव्यांची उत्पत्ति वाजवीपेक्षां जास्त भडकल्यामुळें अनिष्ट झालेली प्रथा महाराष्ट्रांत सुरू होऊन स्वतंत्र काव्य रचनेचे वाजलेलें दिवाळे रसिकांच्या भावनेस कांट्यासारखें खुपत आहे. स्वतंत्र प्रतिभेच्या अभावामुळें दिग्मूढ झालेले विडम्बन–कवी शारदेकडे प्रतिभेचा प्रसाद मागण्याकरितां गेले. त्यांच्या कटकटीस कंटाळून देवीनें त्यांस

'होईल मनींचें तुमच्या
परि मराल ज्याच्या त्याच्या
स्वमरणें'

असा वर दिला. या वरामुळें भराभर विडम्बन काव्यें निर्माण झालीं. परंतु सर्व कवी (अर्थात् कवितारूपानें) पटापट विस्मृतिगर्तेंत जाऊन पडले आणि अनुकरण हें सर्वथैव त्याज्य आहे अशी त्यांची खात्री झाली. संराक हे विनोदी कवी असले तरी विडम्बक नव्हेत, परंतु विडम्बन काव्यांचें वेडें पीक स्वतंत्र काव्यनिर्मितीच्या आड येऊं लागलें, तेव्हांच त्यांना हें उपहासाचें शस्त्र उपसावें लागलें. आपण सर्कस पहावयास गेलों असतां उत्तम कसरत करणाऱ्या खेळाडूंच्या मध्यें विदूषकानें एखाद्याची नक्कल करून दाखविली तर आपल्याला गंमत वाटते; परंतु एखाद्या सर्कशींत एकहि चांगला खेळाडू

असतां विदूषकांच्या तांड्यानेंच येऊन नकलांचा सपाटा चालू ठेवला तर आपल्याला तिरस्कार वाटेल. त्याप्रमाणेंच विडम्बकांची संख्या प्रतिभाशाली कवींच्या संख्येपेक्षां कमी असेल तरच शारदेच्या राजवाड्यास शोभा आहे. नाहीतर त्या राजवाड्याचा फजितवाडा व्हावयाचा ! 'अमक्या तमक्याची क्षमा मागून—' ही कविता म्हणजे विडम्बनांचा थयथयाट पाहून कवीच्या अंतःकरणाच्या उडालेल्या भडक्यास फुटलेली जळजळीत वाचाच होय. विडम्बनात्मक काव्याच्या आरंभाचा सांप्रदायिक टीप संग्राहकांनीं या कवितेस मथळा म्हणून घेतलेला आहे. चांगल्या कवितेचे विडम्बकाच्या हातून कसे धिंडवडे होतात तें

'तुमचिच कवनें
फिरवुनि कानें
मात्रा अथवा वेलांटी
अंकलची बनवूं आन्टी
गुलाब बनवूं कोरांटी'

या ओळींत कवीनें वर्णिलें आहे.

विडंबन कवींवर बरेचसे तडाखे उडवूनहि कवि स्वतः विडम्बन रचनेच्या मोहांत सांपडल्याचें 'कुण्या एकीस' या कवितेवरून स्पष्ट दिसत आहे. कदाचित् हे विडम्बनांचें विडम्बन असेल तथापि या मोहांत सांपडून परोपदेशे पांडित्यंच्या आरोपास त्यानें स्वतःस पात्र करून घेतलें आहे. दुसरें एक विडंबनगीत 'सजा झालेल्या चोराचें गाणें' यांत 'डोळ्यांनीं बघतों' या शालेय कवितेचें विडम्बन नैपुण्यदर्शक आहे; तथापि कवितेच्या बाकीच्या भागांतील विचार विस्कळीत वाटतात आणि कवितेचा आरंभ व शेवट यांत रसाच्या दृष्टीनें बेसूरपणा वाटतो.

तथापि विडम्बनात्मक नव्हत अशा प्रकारचीं उपहासात्मक कवनें करण्यांत कवींचा हातखंडा आहे. व उपहासात्मक कवितेचे आद्य कर्ते

कै.मोगरे यांच्या पाठोपाठ कालानुक्रमानें संराक यांनाच स्थान मिळेल. मोगरे यांचें राजकारणांतील लक्ष किंवा त्यांची दीर्घकाव्यनिर्मितीची शक्ति संराक यांच्यांत दिसत नसली तरी संराकांचा तिखटपणा जास्त जलाल वाटतो. भोंपळी मिरची आणि लवंगी मिरची यांत जो फरक असतो तोच मोगरे आणि संराक यांच्या उपहासात्मक कवनांत दिसून येतो. आकार व गुण यांचें प्रमाण व्यस्त असतें.

'देवपूजा' या हास्यरसात्मक प्रकरणांत देवपूजा करीत असतांना जरी पूजकाची एकाग्रता देवावर नसून त्याचें चित्त भलतीकडे गुतलेलें असतें तरी त्याचे हात मात्र यंत्राप्रमाणें सर्व विधी कसा पार पाडीत असतात त्याचें वर्णन स्वभावोक्तिमय भाषेंत कवीनें केलेलें आहे. उपहासात्मक काव्याचें हें सुंदर उदाहरण आहे.

'धावा यमरायाचा' या उपहासात्मक काव्यांत कवीनें यमरायाचा धावा करून कवींच्या वाढत्या संख्येस आळा घालण्याची विनंती केली आहे. या कवितेची भाषा विनोदपूर्ण असून

'पांढऱ्यावर करतां काळे । झाले काळ्याचे पांढरे ।।

या वाक्यांतील शब्दांची उलटापालट बहारीची आहे. लेखक स्वतः कवि असल्यामुळें हा धावा म्हणजे स्वतःच्या पायावर धोंडा पाडून घेण्यासारखेंच आहे. याची जाणीव

'म्हणुनी प्रार्थितों जगद्वारि । येऊं नको माझ्या घरीं ।।

या ओळींत त्यानें दाखविली आहे. 'याचका याचकं दृष्ट्वा श्वानवत् गुर्गुरायते,' या वृत्ताप्रमाणें एका कवीला आपल्याशिवाय इतर कवी खपूं नयेत हें साहजिक आहे. रामदास आणि तुकाराम यांच्या वेळेपासून इतर कवींचा मत्सर संतकवींनी देखील केलेला दिसतो.मग त्यास संराक कसे अपवाद ठरतील?

'एका कवीचा मृत्युलेख' ही कविता कुकवींवर ओढलेला एक कोरडा आहे. ज्याला वाचकवर्ग टाळीत होता, ज्याला स्फूर्तीचा लवलेश

शिवला नाहीं व ज्याच्या काव्यसुमनांचें महत्त्व संख्येंतच आहे अशा कवीला त्याच्या बाडांचेंच सरण रचून जाळून टाकण्यांत संपाक यांनीं विनोदनिष्ठुरता दाखविली आहे. या अज्ञात कवीचा हा कीर्तिस्तंभ प्रतिभाशून्य ओळी-जुळव्यांस तांबड्या बावट्याप्रमाणें प्रतिबंधक वाटो अशा सरस्वतीजवळ प्रार्थना आहे.

जाहिरातींवर पोट भरणाऱ्या कित्येक नियतकालिकांत चालू कथेचे किंवा कादंबरीचे तुकडे इतस्ततः फेंकून दिलेले असतात. आणि जाहि-रातींच्या जंगलांतून पुढील कथानक शोधून काढतां काढतां वाचकांच्या नाकीं नव कसे येतात यावर सडेतोड परंतु मार्मिक टीका ' एका साप्ताहिकांतील एक चटकदार गोष्ट ' या कवितेंत केला आहे. सामान्य वाचकवर्गास तिच्यांतले मर्म पटल्याशिवाय राहणार नाहीं. कवीच्या रचनाकौशल्यास ही कविता श्रेयस्कारक आहे.

' माझी लघुकथा ' हा नियतकालिकांच्या लेखकवर्गावर ओढलेला कोरडा आहे. प्रेमविषयक कविता, गुप्तपोलिशी गोष्टी किंवा नाट्यछटा यांत गति न चालल्यामुळें इंग्रजी लघुकथेचें रूपांतर करण्याची वेळ एका लेखकावर येते व

" दोन थोरांचे कल्पना विचार
सदा एका रेषेंत चालणार "

या ठराविक उत्तरानें तो आक्षेपकांचें समाधान करूं पाहतो.

" कथा काव्यांतुनि सदा वाहिलेलें
किती लेकांनी तसें पाघळिलें "

या ओळींतील लेकांनीं या शब्दावरील टीप कवीचा जातिवंत मिस्कीलपणा दर्शविते. ती टीप अशी आहे:—

**ही शिवी नव्हे; ' लेखकांनीं ' असें आहे, यतिभंग का काय म्हणतात, तो होऊं नये म्हणून मधला ' ख ' गाळला आहे !**

'गड्या ! खरें बोल,' या उपालंभात्मक कवितेंत विद्वत्तेचा आव आणणारा संपादकवर्ग, आंबट वरणास महाग होऊन काल्पनिक अमृतपानांत दंग होणारे कवी, खऱ्या खोट्याचा विधिनिषेध न बाळगणारे वकील, फक्त सप्पा करणारे देशभक्त वगैरे ढोंगी लोकांवर कवीनें ताशेरा झाडून जगतांत बोकाळलेल्या स्वार्थाची खंता दर्शविली आहे. तथापि असल्या या खंती उत्पन्न करणाऱ्या जगांत दिव्यप्रेषित महात्म्याची मूर्ति डोळ्यांपुढें दिसून त्यास आशा वाटलेली आहे. कविता लिहिल्यानंतर महात्म्यांनी ज्या नाना प्रकारच्या कोलांट्या उड्या टाकिल्या त्यांवरून आतां कवीपुढील तेवढाहि आशेचा किरण नाहींसा झाला असला पाहिजे अशी सकारण भीति वाटते ! आपण तेवढे निःस्वार्थी, पुण्यवान् आणि सत्यप्रिय, आणि बाकीचें जग आपमतलबी व ढोंगी असें कित्येक लोक अट्टाहासानें जगापुढें मांडीत असतात. त्यांतच प्रस्तुत कवीची गणना करावी लागत आहे.

संराक यांच्या कित्येक कविता कूटप्रश्नात्मक आहेत, त्या वाचताना "हा पदार्थ उमगा षण्मासिचा वायदा" असें बजावून कोडीं घालणाऱ्या विठ्ठल कवीची आठवण होते. संराकांचे कूटप्रश्न आधुनिक युगास साजतील अशा प्रकारचे आणि चातुर्ययुक्त आहेत.

'मी कोण ?' या कूटप्रश्नात्मक कवितेत नोकरवर्गास मासिक पगारावर कसें अवलंबून रहावें लागतें त्याचें खुबीदार वर्णन आलेलें आहे. साधारण प्रापंचिकाची दैना व तारांबळ यांत सहानुभूतिपर शब्दांनीं वर्णिली आहे.

'बाळ्या मला कां आवडतो ?' ही कविता अशीच कूटात्मक असून तिचें शेवटल्या ओळींत दिलेलें उत्तर वाचनीय आहे.

'अशि सुंदर अविवाहित तरुण बहिण त्याची'

'बाळ्याच्या.........?' ही कूटप्रश्नात्मक कविता पहिलें चुंबन या कवितेंतल्या सारखीच असल्यामुळें पुनरुक्तिमय वाटते.

'हा कोण ?' ही कविता इतर अनेक कूटप्रश्नात्मक कवितांप्रमाणेंच कवींचें नैपुण्य प्रकट करणारी आहे. अव्यक्ताला मूर्त रूप देणारी, स्वतःचें तोंड काळें करून दुसऱ्याला शुभ्र कीर्ति मिळवून देणारी, प्रतिभाशाली लेखकांना ( येथें कवीनें यमकपूर्तीसाठीं 'वीरांना' देखील दडपून दिलें आहे ) नतमस्तक करावयास लावणारी अशी ही कोण ! असा प्रश्न करून 'लेखणी' हें त्याचें उत्तर कवीनें दिलें आहे.

कूटप्रश्नांपेक्षां सराफ यांच्या चतुरोक्ति अधिक मनोहर व भाषाप्रभुत्व निदर्शक आहेत. संस्कृत किंवा मराठी सुभाषित वाङ्मयांत अशा चतुरोक्ति पुष्कळ आढळतात; परंतु इंग्रजी भाषेच्या शद्बदारिद्र्यामुळें तींत त्यांचा भरणा कमी आढळतो. अर्थात् इंग्रजी टीकाशास्त्राच्या उष्ट्या पत्रावळी गोळा करून तत्वशास्त्रज्ञत्वाचें स्तोम माजविणारे आधुनिक टीकाकार या प्रकारच्या कवितांस कदाचित् नाकें मुरडतील व त्या भावनैकगम्य नसल्यानें त्यांत काव्यांश नाहीं असा शेरा ठोकतील. परंतु आधुनिक टीकाशास्त्राबरोबर परंपरागत अलंकारांचें ज्यांनीं अध्ययन केलें असेल त्यांस सराफांच्या चतुरोक्ति पेशवाईकालीन शाहिरांच्या चतुरोक्तींप्रमाणेंच आल्हाददायक वाटतील.

'प्रथमा ते संबोधन' ही कविता चतुरोक्तीचें उदाहरण आहे. प्रथम दिवसापासून अष्टम दिवसापर्यंतच्या प्रेमाच्या चढत्या पायऱ्या विभक्तींच्या नांवानें वर्णन करण्यांत कवीनें कोटीबाजपणाची शर्थ केली आहे. त्यांतल्या त्यांत अद्वितीय, पंचमी, षष्ठी व संबोधन या शद्बांवरील कोट्या अनपेक्षितपणामुळें विशेष कुतूहलजनक वाटतात.

'काहीं समस्या' या प्रकरणांत राम जोश्यांच्या छेकापन्हुतीच्या धर्तीवर चार समस्या आहेत. त्यांपैकीं पंतोजीची छडी आणि मित्रनामा प्राणी या दोन हृद्य वाटतात. त्यांतल्या त्यांत दुसरी समस्या कवीच्या नैराश्यवादाची चुणूक दाखविते.

'विराम चिन्हें' या सुंदर काव्यांत आयुष्याच्या वेगळाल्या स्थितींवर स्वल्प विरामापासून उद्गार चिन्हापर्यंतच्या चिन्हांनीं दर्शविलेल्या विकारांचा पगडा कसा बसलेला असतो याचें दिग्दर्शन केलेलें आहे व शेवटीं **पूर्ण विराम** देवविण्याची परमेश्वराजवळ याचना केलेली आहे. या काव्यांतील हास्यरसावर औदासिन्याची सावली पडलेली असल्यानें त्याला मेघखंड शिवलेल्या चंद्रबिंबाचें मनोहारित्व आलेलें आहे.

'माझ्या जीवितांतील ऋतु,' हे एका फजीत झालेल्या तरुणाचें आत्मकथन किंचित् 'विराम चिन्हांच्या' धर्तीवर आहे. कथानायक एका तरुणीवर मोहित होऊन सर्व जीवितास **वसंत** मानितो; परंतु त्याच्या प्रेमी चाळयांचा सुगावा लागतांच तिचे आप्तेष्ट त्यास 'खाऊ' देऊन त्याच्या आयुष्याचा **ग्रीष्म** ऋतु करून टाकितात व ओघानेंच त्याच्या नेत्रांतून **वर्षाव** सुरूं होतो. त्याची नोकरी चाकरी जाऊन त्यास **शि[illegible]राचा** अनुभव घ्यावा लागतो. कवितेचा शेवट मात्र ओढून ताणून आणिल्यासारखा दिसतो. **हेमन्त** व्याख्यानमालेचा संबंध असल्या उनाड नाऱ्यांशीं स्वाभाविक रीतीनें येत नाहीं. त्याऐवजीं हेमन्त ऋतूंत कथानायकास थंडा फराळ घालून शिशिर ऋतूंतील ण तत्कालीन शंखवाद्यानें त्याला साजरा करावयास लाविला असता तर सांखळी पूर्ण झाला असती असे मला वाटतें.

सराफ यांच्या बुद्धिजन्य व बुद्धिगम्य कवितांचा परिचय करून दिल्या नंतर त्याच्या हृद्य कृतीची तोंडओळख करून दिली पाहिजे.

'सोन्या सारं काहीं बोलतो!' या कवितेंत हास्य आणि वत्सल या रसांच हृदयंगम मिश्रण साधलेलें आहे. मुलाच्या लीला आईस किती आवडतात आणि त्याच्या क्षुल्लक व सामान्य कृतींनीं ती किती वेडावून जाते याचें सुंदर चित्र कवीनें रेखाटलें आहे.

**मातेच्या हृदयास काय न दिसे ? मातें मनीं वाटलें**
**शद्ब्रह्म समस्त भासत तिला सोन्यांत सामावलें**

हें या प्रकरणाचें तात्पर्य कवच्याच सुंदर शब्दांत दिल्यावाचून राहवत नाहीं.

'तेव्हां आणि आतां' या नाट्यगीतांत जिनें आपल्या लहानपणीं सासुरवास भोगला परंतु तो भोगतांना आपल्यालाहि सासूपणाचे दिवस यावयाचे आहेत अशा आशेवर निमुटपणें हाल सोसले, पण जिला पुढें अत्याधुनिक सून मिळाल्यामुळें आपली हौस फेडून न घेतां पुन: सुनेकडूनच छळ सोसावा लागत आहे अशा आधुनिक काळांतील सासूचें गाऱ्हाणें वर्णिलें आहे. चार दिवस सासूचे आणि चार दिवस सुनेचे अशी म्हण आहे; परंतु क्रांतिकाळांत अनेक अन्यायांची फेड प्रतिअन्यायांनीं होणें दुरापास्त होतें आणि उसन्याची फेड तर राहोच, परंतु अन्यायाची न्याय्य भरपाई देखील होत नाहीं, हें तत्त्व या हास्य व करुण या परस्परविरोधी रसांच्या मिश्रणानें बनविलेल्या या कवितेनें जगापुढें मांडिलें आहे.

'एका शब्दासाठीं विनवणी' या कवितेंत एक गृहस्थ आपल्या रुष्ट स्त्रीची अबोला सोडण्याकरितां विनवणी करीत आहे, परंतु ती सिद्धीस न गेल्यानें त्यानें तिच्या तोंडून 'इश्श' हा शब्द वदविण्यास कशी युक्ति योजिली तिचें वर्णन आहे. ही कविता शृंगारप्रधान असून तींत हास्यरसहि मिश्रित केला आहे. त्यांतल्या त्यांत खालील दोन उपहासात्मक कविता प्रणयी व्याजगीताचे गमतीदार मासले म्हणून चाखून पहाण्याजोग्या आहेत.

तीन वाजुनि दहा मिनिटें सये !
जाहलीं तरि कशी करुणा न ये
थेटरांत गरदी बहु होइल
रुष्टता न जरि सत्त्वर जाइल ॥ ५ ॥

लेस, पातळ, पावडर क्रीमही
स्नो, तसेच किती तरि सेंटही
रेशमी नवनवे किति ब्लाऊझ
ऑर्डरीन, गुणिले ! तुझियास्तव ॥ ६ ॥

'पत्नीचें हृदय,' या कवितेंत कजाग परंतु प्रेमळ आणि व्यवहार-चतुर पत्नीचें स्वभावचित्र सुंदर रेखाटलें आहे. कजाग पत्नीचें पतीस उद्देशून कठोर भाषण रोजच्या परिचयाचेंच असल्यामुळें व तेंहि वरवर ओठा-पासूनच असल्यामुळें कर्कशापतीस झोंप लागावी यांत नवल नाहीं. त्याचप्रमाणें कठोर भाषणानंतर तिच्या अंतःकरणास पतीच्या शांत वृत्तीमुळें प्रेमाचा उमाळा यावा हें दृश्य साधें परंतु मनोहर आहे.

तीन कविता कथनात्मक असून त्या सर्व हास्यप्रधान आहेत.

'दिवाळसण' या कवितेंत प्रसंग चटकदार करतां येण्यासारखा असूनहि कवीनें त्याचा फारसा लाभ घेतला नाहीं. तोतया जावयाची बडेजाव थोडीशी झाल्यानंतर त्याची तोतयेगिरी उघडकीस येऊन नंतर फजिती झाल्याचें वर्णन ऐकावयास मिळालें असतें तर कविता हास्यप्रचुर झाली असती.

'शारदा कीं मृच्छकटिक' हा एक हास्यकारक प्रसंग कवीनें साजेशा भाषेंत वर्णिला आहे. नाटक मंडळीचें नांव, 'श्रीप्रासादिक स्त्रीविभूषित चलद्भ्रू-भारिणी' हें विबुधजनचित्तचकोरचंद्रिका वगैरे जुन्या लांबलचक नांवाची आठवण करून देतें. या मंडळीनें आपल्या चंद्रमौळी नाटकगृहांत शारदा खेळ लाविला असतां मेघराजांनीं मृच्छकटिक नाटकांतील देखावा रंगभूमीवर स्वाभाविक उत्पन्न करून शारदेस आपण वसंतसेना आहों असा संभ्रम पाडिला व त्याच्या भरांत तिनें श्रीमंतावर चारुदत्तत्वाचा आरोप केला. या कवितेत प्रसंगजन्य विनोदाशिवाय एका नाटकांत बारा वर्षांच्या मुलीचें तर दुसऱ्यांत वास वर्षांच्या तरुणीचे; तसेंच एकांत म्हाताऱ्याचें तर दुसऱ्यांत तरुणाचें सोंग घेणाऱ्या अप्रयोजक नटांवरहि टीका केलेली दिसते.

'प्रिया आणि बायको' या कवितेंत कल्पनासृष्टि आणि सत्यसृष्टि यांतील विरोध दर्शविला आहे. सर्व सकाळभर काव्यसृष्टींत विहार करून रचलेल्या सुनीतावलीचे धिंडवडे कवीच्या बायकोनें कसे केले हें पहाणें फार

मजेदार आहे. काव्यसृष्टींत रमणारा कवि आणि सत्यसृष्टींत त्याच्याचसाठीं राबणारी त्याची अरसिक पत्नी हा विजोड जोडा अनेकांनीं वर्णिला आहे व कविपत्नीचे अरसिक उद्गार श्रोतृजनांना वारंवार ऐकवून त्यांच्या मनाची करमणूक केली आहे. अनेक लघुकथालेखकांनींहि रसिक पुरुष व अरसिक स्त्री अशीं विजोड दंपत्यें एकत्र बांधून त्यांतील पुरुषांविषयीं वाचकांची सहानुभूति आळविली आहे. पुरुष हा गद्यमय आणि स्त्री काव्यमय असावी असा निसर्गसंकेत असतो; परंतु व्यवहारशून्य दुबळ्या मनाच्या चरण-कुळव्याशीं जन्माची गांठ पडली असतांना गृहिणीरूप काव्यदेवतांनीं 'चामुंडा' किंवा 'हडळी' बनावें यांत नवल तें कोणतें ! कल्पनेच्या तरंगांवर मनानें पोहत राहणाऱ्या कवीस जोपर्यंत जडदेहाचे धर्म त्यागतां येत नाहींत तोंपर्यंत त्याची प्रिया वेगळी आणि बायको वेगळी असें व्हावयाचेंच !

संराक यांनीं विशिष्ट कवितांचीं विडम्बनें करण्यापेक्षां विडम्बनीय पद्धतीस वांकुल्या दाखविल्या आहेत. विशेषतः 'काव्य' या प्रकरणांत

अन् म्हणे ' कविता नसली जरी
तरि न अंक मनोहर भासतो
गद्य मजकुर वृथा स्थल ग्रासतो.

या ओळींत त्यांनीं रविकिरण मंडळाच्या पद्धतीचें विडंबन केलेलें दिसेल.

समेट या कवितेंतील उदंड शब्दाचें उद्दंडो असें रूप बापरून त्यावर दिलेली टीप, ' कवि आणि मरण ' यांतील शेवटची ओळ वगैरे निरनिराळ्या कवन पद्धतींचीं विडम्बक अनुकरणेंच आहेत. संराक यांचा भाषापद्धतीहि इंग्रजीशब्दप्रचुर दिसते त्याचें कारण हल्लीं आपल्या बोलण्यांत इंग्रजी शब्दांचा भरणा फार मोठा झाला आहे, त्यावर टीका करण्याचा त्यांचा हेतु असावा हें उघड दिसतें.

ट्रॅन्स्फर् सीन घडे तसे चमकले डोळ्यापुढें काजवे ॥
" ऑटोमॅटिकलीच देव पुजिला एकेक जाई करीं ॥ '
' कांहीं वॉर्म्थ् न अंश मात्र उरली ' मन्मिलप्रेमांतरीं ॥ '

इत्यादि आंग्लशब्दमिश्रित ओळी हीं चालू भाषापद्धतीवर कडक टीकाच होय. तथापि कोणत्याहि विशिष्ट व्यक्तीवर किंवा व्यक्तिसमूहा-वर संराकांनीं आपल्या लेखणीचें हत्यार उपसलें नाहीं. त्याचप्रमाणें ग्राम्यता किंवा अश्लीलता यांनाहि त्यांनीं थारा दिला नाहीं. कळपांत राहणाऱ्या कवींत त्यांची गणना नसल्यानें त्यांच्या अभिनव भाषापद्धतीचें किंवा विचारसरणीचें फारसें कौतुक झालेलें नसलें तरी त्यांच्या कृतीची खरी पारख करण्यास

काले ह्ययं निरवधिर्विपुलाच पृथ्वी

हीं सदैव सज्ज आहेतच. सरते शेवटीं व्याजभावगीतांचे एक आद्य प्रवर्तक आणि निर्मळ विनोदी काव्याचे एक जनक रा. संतुराम रामकृष्ण कर्णिक यांची कृति प्रत्यक्ष अनुभवून स्वतःचें मत बनविण्याबद्दल वाचकांस विनंती करून प्रस्तावना आटोपती घेतों. आतां पान उलटा आणि हे पहा कवि आपली एकतारी भेऊन तुमच्या सेवेला हजर होत आहेत !

अनंतचतुर्दशी
शके १८५६

चिंतामण विनायक जोशी.

# सहाय्यकांस आहेर



कोल्हापूर येथें १९३२ साली भरलेल्या १७ व्या मराठी साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्ष व मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्धीकडे आस्थापूर्वक लक्ष पुरविणारे करवीरचे सन्मान्य नागरिक **रावबहादूर दत्ताजीराव माधवराव भोंसले,** श्रीमन्महाराज छत्रपति सरकार करवीर यांचे चीफ् सेक्रेटरी यांनीं माझी विनंती मान्य करून हें पुस्तक स्वतःस अर्पण करण्याची परवानगी दिली याबद्दल मला कृतज्ञता वाटत आहे.

बडोद्याचे सुप्रसिद्ध साहित्यसेवक व प्रख्यात विनोदी लेखक **प्रो. चिंतामण विनायक जोशी एम.ए.** यांनीं परिचयात्मक प्रस्तावना लिहून दिल्याबद्दल त्यांचा मी आभारी आहे असें म्हणणें म्हणजे प्रोफेसरसाहेबांचें माझ्या ठिकाणीं जें प्रेम आहे त्यास उपचाराचें स्वरूप दिल्यासारखें होईल. तथापि आभार मानावयास निघाल्यावर आभार न मानणें अप्रस्तुत होईल म्हणून मी त्यांचे आभार मानतोंच.

माझे बालमित्र श्रीमन्त **चिंतामणराव धुंडिराजराव उर्फ बाळासाहेब पटवर्धन कुरुंदवाड ज्युनिअर** यांनीं अत्यंत उत्साहानें या पुस्तकांतील चित्रें काढून दिल्याबद्दल त्यांचा, तसेच चित्रांच्या कामीं इतर सहाय्य केल्याबद्दल सरदार्स स्कूलचे चित्रकलाशिक्षक **मि. हिर्लेकर** यांचा मी फार आभारी आहे.

कव्हरवरील सुंदर चित्र कोल्हापूरचे प्रसिद्ध आर्टिस्ट व माझे तरुण मित्र श्रीयुत शशिकिशोर चव्हाण यांनी अत्यंत अल्पावधींत परंतु अत्यंत सुंदररीतीनें काढून दिल्याबद्दल त्यांचेहि मी मनःपूर्वक आभार मानतों.

'सेवक' छापखान्याचे चालक श्री. गणपतराव जाधव व श्री. शंकरराव भोंसले यांनीं आपलेपणाच्या कळकळीनें अल्पावधीत पुस्तक छापून प्रसिद्ध केल्याबद्दल त्यांचेहि याठिकाणीं आभार मानले तर मित्रत्वाची भावना दुरावली असें त्यांनीं समजण्याचें कारण नाहीं.

याशिवाय ज्या ज्या व्यक्तींचें या पुस्तकाच्या कामीं सहाय्य झालें त्यांचे त्यांचे मी अंतःकरणपूर्वक आभार मानीत आहे.सर्वांचा नामनिर्देश न करण्याचें कारण विस्मृति नसून स्थलाभाव होय हें ते जाणतीलच.

कोल्हापूर<br>
ता. १० डिसेंबर १९३४ } स. रा. कर्णिक

---

# कवितानुक्रम.

—:०:—

——

# प्रकाशकीय.

—:०:—

प्रस्तुत पुस्तक वाचकांच्या हातीं देतांना मला अत्यंत आनंद होत आहे. महाराष्ट्राचा 'ट्रेडमार्क' गांभीर्य असल्यामुळें साहजिकपणेंच मराठी वाङ्मयांत विनोदाला विशेष महत्वाचें असें स्थान नव्हतें. कालक्रमानें हा 'ट्रेडमार्क' पुसट होत जाऊन ललित वाङ्मयाकडे व तदंतर्गत विनोदाकडे महाराष्ट्रीय लेखक-वाचकाचें लक्ष वधू लागल्यामुळें निरुपद्रवी गोडस विनोदाचा ठसा त्याजागीं हळूहळू उमटूं लागला आहे. प्रस्तुत पुस्तक या होत असलेल्या पालटाचें उत्कृष्ट उदाहरण असून अशा धर्तीचें मराठी वाङ्मयांतील हें पहिलेंच पुस्तक होय. आमचे सन्मित्र श्री० संतुराम रामकृष्ण कार्णिक यांनीं हें पुस्तक आमच्या सेवक ग्रंथमालेच्या ललित विभागांतील प्रथम पुष्प म्हणून प्रसिद्ध करण्याची संधि दिले, याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. सेवक ग्रंथमालेचें हें पहिलेंच अद्वितीय पुष्प रसिकांस प्रिय होईल अशी मला उमेद आहे.

ग. गो. जाधव

———

# " संराक "



## कांहीं समस्या

जळीं, स्थळीं भरलास । काष्ठीं पाषाणीं आहेस
स्वप्नीं नित्य भासतोस । जगा व्यापून उरलास
कां हो, कोण विश्वंभर ? । नव्हे नव्हे सावकार
लवलवे अंगोअंगीं । लिंबकांतीची चावेंगी
स्पर्शासाठीं उतावळी । कोण असे ही सोज्वळी
कोणी असेल छबकटी ! । नव्हे पंतोजीची छडी
कळों नेदी कैसा कापी । गळा अलगत यद्यपी
गळीं हात हातोहात । गळा कापिला क्षणांत
कां हो खाटीक कां कोणी ? । नव्हे मित्रनामा प्राणी
तिची चाल ही वांकडी । वळणाची नागमोडी
दंशी ओतिते अमृत । कोण्या नागिणीची जात ?
नाहीं नागीण कोणची । पारि कविता " संराका " ची

# ही कोण ?

तुझा आणि माझा जडला जिवाचा जिव्हाळा
तुझ्या संगतीचा धरिला सदा एक चाळा
अन्तरंग माझें सारें तुझ्या मुखीं येतें,
आणि तिथुनि रसिकांलागीं पुढें ज्ञात होतें.

मूर्तरूप अव्यक्ताला तूंच गडे देसी.
गूढ भाव मनिंचे माझ्या तूंच जाणतेसी
करुनि वदन काळें अपुलें, मला मात्र देसी
शुभ्र कीर्ति मिळवुनि जगतीं रीति तुझी ऐसी.

किती कवी प्रतिभाशाली, ग्रंथकार, वीर
तुझ्यापुढें झाले सखये ! नतमस्तक धीर.
ध्यास मनाला मम सजणे ! तुझा एकटीचा
तुझ्यापुढें खाणें, लेणें आणि व्यर्थ वाचा.

क्षणाच्या तुझ्या विरहानें जीव विकल होई
वाहतों तुझ्या चरणीं तो नम्र करुनि डोई

\+ \+ \+ \+

कवे ! सांग ऐसी कोण ? काय तुझी भार्या ?
नव्हे; लेखणी ही माझी खरी रसिक आर्या.

---

# माझ्या जीवितांतील ऋतू.

उद्यानीं रमणी कुणी बघुनि मी बेहोष झालों मनीं
रम्या मूर्ति तिची अधिष्ठित करीं चित्तांत रात्रंदिनीं
आशेची कलिका डुले मनिं, जनीं सृष्टीहि आनंदली
सारे वृक्ष, लता फुलें, कमलिनी उत्फुल्लता पावली.

शेजारीं वठल्या तरूवरि जरी एकाक्ष काकावतो
वाटे कीं निजगान कोकिळ करी आम्रावरी आज तो.
जीवाचा ऋतु तैं **वसंत** गमला भेटीस आला क्षणीं
झालों मी अनुरक्त हें परि तिच्या नाहींच ध्यानीं मनीं.

× × × +

नादीं लागुनि सोडिला सकलही मी कामधंदा बरा
तेव्हां चालुनि ऑफिसांतुनि घरा 'डिश्चार्ज' आला खरा
नाहीं बाळगली क्षिती बघुनि जी मूर्ती मनीं स्थापिली
प्रीतीसाठिं तिच्या फकीर बनलों लज्जा तशी सोडिली.

बुध्द्यां खांकरुनी बळेंच हंसुनी मत्प्रीति दिग्दर्शिली.
गेले व्यर्थ प्रयत्न हाय सगळे-नाहीं तिनें जाणिली.
संधी साधुनि एकदां गृहिं तदा गेलों तिच्या मागुनी
तेथें ओपनली ‡ प्रपोज † करणें हा हेतु माझ्या मनीं

राही पार परी क्षणांत अवघा सद्धेतु माझा दुरी
कोपें कांपत, घाबरे बहुपरी ती मानिनी बावरी.

---

‡ Openly. † Propose करणें रसिकांस माहित आहेच.

भ्राते, भृत्य तिचे तसे पति, पिता आले सवें धांवुनी
तेव्हां काय कुवर्तमान घडलें सांगूं कसें तें जनीं !

स्नेही आप्तविशेष लोक मजला धिक्कारितो सर्वही
वर्मे काढुनि पाखडीत नसती माझ्यावरी आगही.
झालें सर्व भकास, प्रेम सरलें आशा न कांहीं उरे
तेव्हां जीव गमे उदास जगतीं ग्रीष्मामधें वावरे.

× × × ×

एकान्तीं असतां विचार करतों मी भग्न आशेवरी
प्रेमाचे नवमेघ नित्य झरती नेत्रांतुनी भूवरी.
अश्रूंनीं अभिषिक्त मन्मनिं जधीं होई मनोमोहिनी
तेव्हां वाटतसे मला अवतरे वर्षाऋतू जीवनीं.

× + + +

वार्ता लोकिं प्रसार पावत क्षणीं कीं ‘ अक्कलेचे दिवे ’—
यानें पाजळले, अतां फिरतसे निर्घोर चोंहींकडे.
लोकीं वाटतसे जरी शरदिं मी दीपावली लाविली
माझी वृत्ति परंतु घोर तिमिरीं लोपूनियां राहिली.

× × × ×

गेली चाकरि, आज भूक शमवी थंड्या फराळावरी
कांहीं ‘ वॉर्म्थ ’ न अंशमात्र उरली मन्मित्रप्रेमान्तरीं
सारें थंड सभोंतिं, प्रेमतरुची गेली लया पालवी
जीवाला शिशिरर्तु हा न कळणें केव्हां कसा मालवी.

+ + + +

माझा मी म्हणुनीच आज जगतीं जीवन्त आहे बरें !
कांहीं कार्य परंतु रिक्त जगतीं निष्काम † जीवा नुरे
तेव्हां "देशहितार्थ सार्वजनिक व्याख्यानबाजी करूं—
हेमन्तात,‡" मनीं असें ठरविलें कीं, "मुंबईला सरूं."

---

† नोकरी नसलेल्या किंवा कामधंदा सुटलेल्या. ‡ मुंबईच्या 'हेमन्त व्याख्यानमालें' त पुष्प गुंफण्याकरतां आमन्त्रण आणविण्याच्या खटपटींत सध्यां मी गुंतलों आहे. अर्थात् माझें पुष्प, 'प्रेमपुष्प' असणार हे काय रसिकांस...इत्यादि. या कवितेंतील हेमंतशिशिरांची अदलाबदल काव्यसृष्टी पुरतीच असल्यानें सत्यसृष्टींतील ऋतुमानास धक्का बसेल या भीतीचें कारण नाहीं.— कवि.



# अमक्या तमक्याची क्षमा मागून

रडलों गीतें कितीतरी
आजवरी भिक्षेवारी
तुमची प्रतिभा
अमुची कविता
घेउनि जगताबाजारीं
हिंडहिंडलों परोपरी
निजकवितेची नादारी
झांकु अम्ही उसन्यावारी
अमक्या तमक्या,
सोम्या गोम्या,
क्षमा करी रे क्षमा करी
मदार सारी तुझ्यावरी.
कुणी मासिकांमाझारीं
कवितेची खैरात करी.
तेथें दारीं
जमले भारी
आसपासचे माधुकरी
भिक्षांदेही—वारकरी.

जरि तुमचीं कवनें भारी
अमुची रीत परी न्यारी
तुमचिंच कवनें
फिरवुनि काने—
मात्रा अथवा वेलांटी
अंकलची § बनवूं आन्टी.
गुलाबें बनवूं कोरांटी
महावस्त्र अथवा छाटी
दावुनि ऐशी
कसरत खाशी
सुखें बोंबलूं सदा वरी
'क्षमा करी रे क्षमा करी'
आणि वाचका ! आजवरी
किति कविता केरावारी
आम्ही रचिली
तुम्हीं वाचिली
शिळी शिदोरी क्षमेवरी
पैदा केली; घ्या पदरीं.

---

§ तुम्ही काका लिहिला कीं आम्ही एक वेलांटी add करून 'काकी' बनवलीच असें मला म्हणायचें होतें. परंतु तें मराठी जमेनाच. म्हणून नाइलाजानें Uncle व Auntie हे इंग्रजी पर्याय वापरले आहेत. एरवीं मी कट्टर स्वदेशी असून चुकूनदेखील इंग्लिश वर्ड यूस करीत नाहीं.—कवि.

कुणी सत्कवी पाजळती
कवितेची दिव्य ज्योति
होई परि ती
पिशाचहातीं
कोलित, मग कवि करतात
नंगा नाच उजेडांत.

विडंबनाचे हो विडंबन
कवितेचा गेला प्राण
तरी न आम्हां
त्याची जाणा
क्षिती एक पळभर वाटे
अम्ही कवी छोटे मोठे.

माफीवाज क्षमावाले !
माझें गीत पुरें झालें
म्हणुनी आतां
जातां जातां
हेंच प्रार्थितों—( क्षमा करा )
' क्षमा करा हो क्षमा करा. '

---

# कवि आणि मरण.



जगीं सांगतात रीत कवींचीच खरी
चोरीस्तव प्राण देती इतरांच्या कवनांवरी.

—होळाजी पोळा.

कुठल्याशा जागीं देख
शहर पेशवाई एक । पसरलें
कविवरें असंख्य तयांत
वाढलीं पुऱ्या जोमांत । सारखीं.
चहुंकडेच त्यांच्या भंवतें
गुडघाभर सारें जग तें । माजलें.
काव्येंहि समजणें यांचीं
ही अक्कल ना जगताची । त्या तशा
त्यांसाठीं शहरांतोनी
तळमळे एकहि न कोणी । अरसिक
तडफडे जीव यांचाच
मांडिति मग नंगा नाच । सारखा.
हाडांचीं करुनी काडें
बाडांवर छापुनि बाडें । काढिती
परि कुणि न विचारी त्याला
बिल घेइ छपाईवाला । चोपुनी

श्रान्तले—पुरे भागले—रडूं लागले
बोलती मग ते
'फसवावें कैसें जनते । यापुढें'

कुणि म्हणे विडंबन करणें
मार्ग हा सुकर आक्रमणें । आपण
विडंबून सत्कविरत्नें
आणुं या सुयश बहु यत्नें । निजगृहीं
सत्कवीविडंबक म्हणुनी
ओळखील जन तरि कोणी । आपणां
मुक्रर हा करुनि विचार
जाहला सुरू व्यापार । नंतर
तो योग—खरा शठयोग—काव्य–हृद्रोग
लागला ज्याला
लागतें जगावें त्याला । हें असें
कोणत्या मुहूर्तावरती
कवि ‘ गोविंदाग्रज ’ गाती । शहरिं त्या
गाइलें ‘ प्रेम अन् मरण ’
ओढवे आमुचें मरण । त्यामुळें
कारण जन फसवायाला
साधन तें गवसे कविला । चांगलें
सरसावुनि पुढती आले
आपुले विडंबन-भाले । कविवर
कुणि चढवि जिने चाळीचे
कुणि मोल करी मोळीचें । तेधवां
परि कोणी जन नच फसले
हे थप्पड खाउनि बसले । कविवर.
मांडिली तपश्चर्या ती
कविब्रुवीं शारदेसाठीं । तेधवां

चुकवाया साडेसाती †
पातली देवता पुढती । त्यांचिया.
ती वदे, ‘ प्रसन्ना झाले
व्हा चिरंजीव हो सगळे । प्रस्तर ’
ते वदति, ‘ तसे आहोंच
एक ऐक विनती साच । देवते ’
चरण ते धरिति—आणखी वदति—‘ देवि हे सुदति !
भेटवी आम्हां
त्या कविच्या प्रतिभाब्रम्हा । एकदां’
ती वदे, ‘ वश न व्हायाची
तुम्हांला प्रतिभा त्याची । कधिंतरी ’
परि हट्ट घेउनी बसती
देवीला बहु आळविती । कोडगे !
‘ प्रतिभेविण कवनें केलीं
स्फूर्तीविण गीतें झालीं । कितितरी
कोणी न विचारि तयांला
धिक् अमुच्या दुर्दैवाला । देवते ! ’
ती त्यांची स्थिति पाहुनियां
भंवतीची हंसली दुनिया । त्याजला
दवताहि कंटाळे ती
टाळाया टकळी त्यांची । बोलते—
‘ होईल मनींचें तुमच्या
परि मराल ज्याच्या त्याच्या । स्वमरणें ’

---

कवींच्या मागची नव्हे. तिच्यामागें लागलेली कवींची.

मग भेटाया त्यां आणी
त्या कविची प्रतिभाराणी । तेधवां
धांवली उताविळ होत
स्फूर्तीची जळती ज्योत । त्यांकडे
आदळे मस्तकावरती
तडतडाहि कवट्या फुटती । सत्वर
मग सगळे कवितावाले
गतप्राण होउनि पडले । भूवरी.
गतप्राण होउनि पडले
परि पडतां पडतां शिकले । तत्त्व हें
दुसऱ्याची प्रतिभा साच
शोभते त्याचि त्यालाच । सर्वदा
अनुकार व्यर्थ हे रीती
होतसे तयानें फजिती । चहुंकडे

तो योग–खरा शठयोग–काव्य–हृद्रोग—
लागला ज्यांला
लागतें मरावें त्यांला । हें असें

विस्मरणार्थ तयांच्या ही फोलांची साल पालवी
अरसिकां रसिकांसाठीं बु वू वो वौ व वा वि वी §

---

§ माझ्या सर्व कवितांत माझ्या अशा या दोनच ओळी मला आवडतात.
— कवि.

# माझी लघुकथा.



पत्र आलें संपादकांकडून
खास अंकाला गोष्ट द्या लिहून
प्रश्न पडला कीं लिहूं तरी काय !
शीर्ष खाजवितां सुचेना उपाय

लेखकांना आधार जयाचा तें
' प्रेम ' झालें ना आज शिळेंपाकें
कथा काव्यांतुनि सदा वाहिलेलें
किती लेकांनीं ‡ तसें पाघळोलें

मनीं आलें मग गुप्त पोलिसांची
कथा खरडावी खुनी रहस्याची
परी पारिचित आठवे ' बाबुराव '
राहि कोठें मग मला तिथें वाव ?

तदा वाटे कीं काव्य तरि करावें
( कुणा ठावें परि कशासवें खावें ! )
कवित्त्वाच्या स्फूर्तीस देत राहे
असा शिमगा बहु दूर अजुनि आहे

मनीं निश्चित मग नाट्यछटा केली
' काय म्हणतां,' सुरवात अशी झाली
परी पुरता तिज नाट पुढें लागे
कल्पनेचा मनिं छटाहि न वागे

इंग्रजीचीं चाळलीं बुकें चार
आणि आला मग पोक्त मनिं विचार
करूं भाषांतर इंग्रजी कथेचें
आणि देऊं दडपून कीं स्वतांचें

जरी कोणी बोलेल चोर मातें
तरी कोटिक्रम पुढिल असे त्यांतें–
" दोन थोरांचे कल्पना, विचार
सदा एका रेषेंत चालणार. "

गोष्ट होईपर्यंत ती तयार
प्रीय संपादक ! जरा धरा धीर
लेखनाची लघुकथा धाडिली ही
तीच छापा तोंवरी विनंती ही—

---

‡ हा अपशद्ध नव्हे. लेखकांनीं असे आहे. सोयीसाठीं मधला ' ख' गाळला आहे इतकेंच. —कवि.

---

# श्रीमन्ताचें काव्य

—:*:—

( महाकवि लॉर्ड बायरन् याने आपल्या हयातींत कवि म्हणून अपूर्व यश संपादन केल्यानंतर इंग्लंडांतील सर्व उमरावशाही ( aristocracy ) कीर्तीसाठीं हपापून हात धुवून कवितेच्या पाठीं लागली. कित्येक लॉर्डांच्या घरीं कवितेचे कारखाने उघडले. आणि त्यांत पोटार्थी वृत्त–जनित्यांस मॅनेजरीच्या जागा मिळून त्यांच्या पेटाची सोय लागली. बहुतेक लेखनाचें कर्तृत्व या मॅनेजर वर्गाकडे असून लॉर्डसाहेब अर्थात्च 'नांवा' चे मालक असत. तशी स्थिति आपल्याकडे आहे असें कल्पून पुढील ओळी लिहिल्या आहेत. )

" उठा, उठा श्रीमन्त सरकार ! काव्य पुरें झालें
सही आपली होणें खालीं फक्त बाकि उरलें

'अ' चा अग्रज, 'ब' चा बांधव, 'क' चा कोणितरी
'–नाथ' '–रमण' वा '–नंदन' ऐशी ठोकुनि द्या स्वाक्षरी
प्रकाशकांची गर्दी झाली भारी दारांत
कोण मिळवितो प्रथम काव्य हीं स्पर्धा त्यांच्यांत

कितेक धनही घेउनि आले द्याया मोबदला
स्तुती तोंडभर कित्येकांची मोबदल्या बदला
लक्ष्मी लक्ष्मीवंताला वश घ्याच फायदा कीं
( सरस्वती पुत्राच्या लेखीं तिची वजाबाकी )

नजर एकदा फिरवा सरकार या कवनावरुनी
आणि पहा कशि कसरत केली शब्दपदांवरुनी
गुलाब, कमळें, कुंदकळ्या, मोगरा तसा चाफा
केला उपमा उत्प्रेक्षांचा खडा तसा ताफा

बागबगीचे मळे आणखी गळे सुंदरींचे
सारें कांहीं खेंचुनि भरलें या कवनीं साचे"

निजकवनांचें चटकदार हें वर्णन परिसोनी
श्रीमन्तांची उठली स्वारी मनि आनन्दोनी.

" वाहवा, वाहवा," वदते झाले खुषींत येऊन
अगदीं हीच हुबेहुब होती मनि कविता छान

तेच तेच ते शब्द आणखी कल्पनाहि त्या त्या
कशा नेमक्या तुलाहि सुचल्या सांग सांग बेट्या ?

" ह्यः ह्यः " करुनी दांत विचकुनी वृत्तजनक वदला
" कशि वर्णावी श्रीमन्तांची नवप्रतिभाबाला !

जिच्यापुढें तो कालिदासही झक् मारित गेला
भवभूती तर बेटा कुठल्या झाडाचा पाला. "

खुषले † मालक, पास जाहली कविता, सहि झाली
प्रकाशकांनीं थैलीचीही गांठ सैल केली

दुसऱ्या दिवशीं जाड टाइपामधें अवतरे ती
स्तुतीपाठकां रत्न वाटली परि इतरां रेती

असेंच कांहीं कांहीं करुनी काव्य तया म्हणणें
श्रीमन्तांना नसे कांहिही कधिं लाजिरवाणें

---

† खुष झाले.

# एका कवीचा मृत्युलेख

काव्य करावें कां म्यां वचकावें दूषितो परि लघूस
कां न सदन बांधावें कीं त्यांत पुढें बिळें करिल घूस

—मोरोपंत.

काव्य करावें कां म्यां वचकावें भूस कीं करिल घूस
कां नच लग्न करावें कीं जाइल पळुन घरुन 'ती' घूस.

—मी स्वतः

## श्लोक.

ज्याला वाचकवर्ग तत्परपणें टाळीत होता बरें
ज्यानें काव्य करून व्यर्थ रचिले भारे तयांचे बरे
कालापव्यय ज्यामुळें घडुनि ये लोकीं तसा जीवनीं
ज्याच्या; तो कवि हा इथें पहुडला निष्प्राण कीं होउनी

भाषेचा अपकर्ष पूर्ण जगतीं आहे जरी पाहणें
फोडा काव्यकपाट † आणिक पहा याचीं जरा लेखनें
यानें जीवित हें वृथा दवडिलें देतील साक्षी अशी
झालों मुक्त म्हणून श्रान्त जनता निःश्वास टाकी तशी

ज्याचें शून्य जिणें जगीं बहुपणें आलें असे प्रत्यया
बाडें छापुनि मुद्रणालय जयें नेलें असें वैभवा

---

† ज्यांत त्यानें आपली कवितांचीं बाडें रचून ठेविलीं आहेत तें कपाट.

मृत कवीचा मृत्युलेख लिहावयास कवीच पाहिजे. म्हणून माझी कवि as such लायकी मोरोपंताच्या तोंडाचें माझें स्वकृत कवन वर उध्दृत करून मी वाचक रसिकांस पटवून दिली आहे. —कवि.

ज्याचें काव्य न यापुढें गवसणें संशोधनावांचुनी
तो हा काव्यमिलिंद येथ पडला मृत्यूपुढें वांकुनी.

स्फूर्तीचा लवलेश ज्यास शिवला नाहीं चुकोनी कधीं
नाहीं बाळगिली फिकीर रचितां काव्यें सहस्रावधी
'केव्हां हा मरतो,' विचार करिती आबालवृद्धें असा
तो हा शब्दसमर्थ काव्यजनिता गेला लयाला असा!

ज्याच्या काव्यिं दरिद्रताहि अठरा विश्वें सदा नांदली.
तैशी अप्रतिभा, अवास्तविकता अव्याहता राहिली.
ज्यानें आक्रमिली निरंतर अहा, पृष्ठें किती मासिकीं
तो हा आज विमुक्त होउनि कवीशार्दूल गेलाच कीं.

ज्यानें नित्य विशुष्क काव्य सुमनें संख्यागुणें मोजिलीं
नाहीं शिल्लक आज एक शपथेला पाकळी त्यांतली.
ज्यानें अमृत भूवरी कुकविता कुंभांतुनी वाहिलें
तो होतां मृत दोन थेंबहि तया त्यांतील ना लाभले.

गेला हाय कवीश्वर त्यजुनियां मिथ्या जगाला दुरी
त्याचें जन्मचरित्र काय म्हणुनी कोणी न पृच्छा करी
कोणी लेश न खंत त्यास्तव करी किंवा चुकोनी पुसे—
'कोठें आणि कधीं तरी जगतिं हा होऊन गेला?' असें.

(त्याचीच कविता सारी आणुनी रचिली चिता
लांकडें गोंवऱ्यांचा न पैचा खर्च लागतां—
झोंपतां उठतां ज्याचा कविता हाच कायदा
जाहला थोडका कां हा त्याचा त्यालाच फायदा!)

———

# काव्य

—:*:—

[ वृत्त— अक्षरें अधिक झाल्यास द्रुतगतीनें म्हणावयाचीं व कमी झाल्यास विलंब लावून म्हणावयाचीं. अतएव वृत्त ' द्रुतविलंबित.' ]

बघुनियां मम हस्तिं ' तुतारि ' ला
परम हर्ष ' तिच्या ' मनिं दाटला
" ऐकलं कां, " वदुनि सोडुनि उद्यम
थडकली सुसमीप * प्रिया मम

मुख दिसे बहु उत्सुक साजिरें
करिं धरी कढि–फोडणिचें जिरें
नयन लाल बहू चुल फुंकुनी
तशिच येइ ' तुतारि ' स पाहुनी.

हिसकुनी झडकरी करिं घेतला
अंक ओढुनि समग्रहि चाळिला.
न मिळतां परि ' कंदमुळें ' † फळें
भिरकवी § दुरि क्रोधभरामुळें.

तणतणे कविताप्रिय सुंदरी
अन् म्हणे " कविता नसली जरी
तरि न अंक मनोहर भासतो
गद्य मज्कुर वृथा स्थल ग्रासतो.

---

* जसें ' सुविहीन '—श्री. कृ. कोल्हटकर. † हल्लीं नामशेष असलेल्या ' तुतारी ' नामक साप्ताहिकांत ' कंदमुळें ' या सदराखालीं विनोदपूर्ण कविता येत असत. § भिरकावून देई. हा कोणी कवि नव्हे !

झडकरीं लिहुनी कळवा तयां
‘ कंदमूळ् ’ प्रकरणीं अमुची स्पृहा
जरि दिसे नच अंकिं चुकून कीं
तरि न वर्गणि देउं फुकाफुकीं ! ”

सबब पाठविली कविता रचून्
पुढिल अंकिं प्रकाशित द्या करून्

अधिक तस्दि तुम्हांस कशास लिहून्
कळतसे बहु सुज्ञ तुम्हीं अनन् ‡

By Order ( of प्रिया )

---

‡ समास दोनदां अन् अन्.

---

# पोंच व अभिप्राय



प्रेमयाञ्चा शेंकडों वेळ केली
आणि पत्रें तर कितिक पाठवीलीं
उत्तराची मी रोज वाट पाहे
परी नेमें नैराश्य येत आहे.
घरावरुनी जातसे डांकवाला
परी नाहीं आणीत उत्तराला.
शिवी त्याला मोजली लाख एक
परी नाहीं मज दाद देत लेक !*
असे जातां दिन दिनामागुनीही
कामधंदा मज सुचेनाच कांहीं
तोंव आशेला पालवी फुटे कीं
डांकवाला दारांत मी विलोकीं
पत्र नव्हतें तव; त्यांत ये लिहून
मासिकाच्या संपादकाकडून—
" लेख तुमचा आतांच येइ हातां, "
आणि " टाकाऊ " अभिप्राय होता.
" बरोबर त्या पोस्टेज पुरें नाहीं
आणि म्हणुनी—" लेख तो कुठें जाई ?
मला याची खंत ना मुळीं वाटे
तुझ्या पत्राची आस मात्र दाटे.

---

लेकाचा [ पोस्टमन् ]

खिन्न चित्तानें किती येरझाऱ्या
आणि डांकेच्या हपीसांत फेऱ्या.
तुझ्या पत्रास्तव घातल्या मिती न
राहि त्यांना परि पत्र तुझें ये न
जरी असते मज पंख तरी येतों
तुझ्यासन्निध तात्काळ उडोनी तों
( मिशा आत्याबाईस जरी येत्या
तरी काका अभिधान पावत्या त्या. )
पत्र कंटाळुनि अखेरचें एक
पाठवीलें कळविलें सर्व दुःख
आणि प्रार्थी कीं, " पोंच तरी यावी
अभिप्रायाची दिशाही दिसावी "
" कधीं होशिल ती होच गडे राजी
प्रेमलिस्टावरि नोंद परी माझी
करुनि ठेवी अन् धाडि ' कॉल ' जेव्हां
इतर सरतीलहि ' कॅन्डिडेट ' तेव्हां. "
आणि तिसऱ्या दिवशींच चमत्कार—
उत्तराच्याऐवजीं आलि तार
पोंच पत्राची आणि त्याशिवाय
दोन ओळींचा पुढिल अभिप्राय—
" अशा चावट शतमूर्ख मर्कटाशीं
कोण सुंदारि लावील लग्न "—खाशी
श्रेयप्राप्ती ही वाट पाहिल्याची
हौस फिटली विटलीहि मन्मनाची !

———

# प्रथमा ते संबोधन.



प्रथम दिवशीं आलीस जैं समोर—
द्वितीयेची रेखीव चंद्रकोर.

जडे तुजवरि मम अ–द्वितीय भक्ति
मधें तृतिया नच खपे कुणी व्यक्ति.

चतुर † थिल्लर मद्बुद्धि परी झाली
प्रेमरंगाची पंचमी उडाली.

रंगढगांची जधिं कमाल झाली—
कितिक मित्रांनीं षष्ठि माझि केली

पुरे म्हणुनी चोरट्या प्रणयलीला
विवाहाचा निश्चयो मनीं केला

सप्तमीला होतांच सावधान
उघड संबोधिन हे' प्रिये, ' म्हणून.

---

† 'मद्बुद्धि जारि चतुर तरी थिल्लर झालो ' असा कसा तरी अन्वय वाच-कांनी करावा. (त्याशिवाय चतुर्थी शब्द ओळींत कसा आणतां आला असतां?) व अर्थाच्या तर भानगडींत पडूं नये कारण प्रेमविषयक सर्व प्रकरणें अनर्थात्मक असतात हें सत्य आहे-— कवि.

# प्रिया आणि बायको.

प्रातःकालिं उठोनियां कविवरें शिल्गाविली जों विडी
काव्यांतील प्रिया अकस्मिक पुढें धूम्रांतुनी घे उडी.

झालें चित्त तदीय तन्मय तदा घेई करीं लेखनी
आहे काय कवींप्रती प्रिय जगीं काव्यप्रियेवांचुनी ?

गोष्टी गोड कितीतरी तिजसवें गुल् गुल् कवी बोलला
चांफा, कुंदकळ्या, गुलाब—सगळीं देखोनिया भाळला.

भ्रान्ती त्यास पडे, स्वकार्य विसरे, प्रातर्विधी राहिला.
संगें घेउनियां प्रियेस कवि तो ओटीवरी पातला.

काळाची नुरली स्मृति क्षितिहि त्या वाटे न त्याची मुळीं
क्रीडारंग करी प्रियेसह रमे श्रीकृष्ण कीं गोकुळीं

पद्में, केतकि, चंद्र दाडिम फळें हीं सर्वही संपलीं
झालें काव्य तयार एक बनली छोटी सुनीतावली.

भङ्गे रंग परी क्षणांत पुढतीं दुर्दैव तें ओढवे
Transfer Scene § घडे तसे चमकले डोळ्यांपुढें काजवे.

ओंचा खोवुनियां, करीं धरुनियां संमार्जनी पातली
त्याची काव्यप्रिया ?—कधींच दडली—'ती' सत्यसृष्टींतली.

"कां हें चालविलें बसून ? सगळीं कामें तशीं राहिलीं
नाहीं लाज जिवास, काय अथवा आहे तुम्ही झोंकिली.

---

§ सीन् यांतील न् चा पूर्ण उच्चार करावयाचा. व 'ट्रॅन्स्फर्सीनघडे' असें एकदम म्हणावयाचें.

जा आतां उठुनी  कितीतरि इथें हा केरवारा पडे
घेतें लोटुनि, † जा चिम्या ‡ रडतसे, घ्या त्याजलाही कडे ! "
चामुण्डा, इडळी अशी कुणितरी त्यातें झणीं भासली
टाकी काव्य तिथेंच काव्यजनिता; अन् धूमहो ठोकिली
काढी केर त्वरें तयांत जिरली त्याची सुनीतावली
' मेला काळ न वेळ काय खरडे ल्याहावयाला मुळीं ? "
ऐसें बोलुनि टोपली उचलली गेली चुली माउली †
गेलें हाय ! सुनीत गीत सगळें—रक्षा पुरी जाहली !

---

† दक्षिण महाराष्ट्रांत 'लोटणे' याचा अर्थ केर काढणें किंवा झाडणें असा करतात. ‡ कवीचें कारटे कदाचित् भावी चिमणाजी अप्पा. † चुलीकडे असा अर्थ 'चुलीमाउली' असा समास समजून त्याचा अर्थ चूल पुजणारी माउली असा केला तरी चालेल.— कवि.

—— ——

# पत्नीचें हृदय

—:*:—

“ मुलखाचा पडला स्वभाव तुमचा बाई चमत्कारिक
संसारांत न लक्ष; एक दिसतें रात्रदिनीं पुस्तक
आहे डाळ घरांतली सरलि ती लांकूडफांटे तसें
यांचें वाटत नाहिं काय तुमच्या जीवास कांहीं कसें ?
सातांला सुटतां ‘ हपीस ’ तुमचें येतां घरीं रोकडे
येतांना जर भाजिपान अणिलें कां पाप तेणें घडे ?
बी. ए. होउनि काय दिग्विजय हो तुम्ही असे लाविला
द्याया अक्कल देव का विसरला ऐसेंच वाटे मला.
टोपी एक दिशेस, कोट दुसऱ्या, वस्त्रें तशीं फेकितां
तीं सारीं जमवोनि रोज तुमच्या हातांत द्यावी स्वतां
जाई जीव थकूनि काम करुनी या उस्तवाऱ्या अशा
नाहीं मी जरि काढिल्या तरि बरी होईल ना दुर्दशा ?
एखादी मिळती कठोर कुजकी रागीट कैदाशिण
‘ मंजे ’ मात्र तुम्हास पूर्ण कळतें—संसार हा दारुण.
कांहीं पातक घोर खास घडलें मागील जन्मीं मला
त्याची फेड म्हणोनि लग्न करुनी दावा तुम्हीं साधिला.
मी आहें म्हणुनीच जीवित तुम्हां निश्चिंतसें लाधतें
खातें ना तर हाल मात्र तुमचे कोणी कधीं श्वान तें
आहे कां हृदयास ढीम तुमच्या मी एवढो बोललें
मेली झोंपहि लागली !—फुकट कां हें बोलणें जाहलें ?”

*　　　*　　　*

ऐसें बोलुनि शाल एक हलके जावोनियां आणिली
माशा देतिल त्रास फार म्हणुनी प्रेमें तया घातली.



ऐसें बोलुन शाल एक हलकें जावेनियां आणिली
माझा देतिल त्रास फार म्हणुनि प्रेमें तया घातली. (पत्नीचें हृदय, पृष्ठ २८)

# एका शद्बासाठीं विनवणी.

( एका प्रणयी पुरुषानें आपल्या रुष्ट प्रेमळ संजीवनीला एका शद्बाकरतां बत्तीस ओळी आळविल्यावर छत्तिसाव्या ओळींत त्यास तो मिळाला आहे. )

प्रियतमे ! रुसशील कितीतरी
मजवरी सखये ! वरचेवरी
विनति दास तुझा चरणीं करी
शब्द एक तरि बोलचि सुंदरि !

कोप व्यर्थ करिसी मसिं मानिनि !
चारु हास्य तरि दावि निजाननीं
प्रणति दास करी कर जोडुनी
शब्द एक तरि ऐकवि, भामिनी !

" सहज खेळविते ललना कशी ! *
स्तुति तुम्हांसच शोभत ही अशी.
परि त्वदीय विचित्रचि खेळ हा
आखु-ओतुसम नाचवितो पहा.

हा तृषार्त बहु चातक जाहला
एक शब्दजलबिंदु तया भला
प्रणयिनी ! जरि देशिल सत्वर
तरि कृतार्थचि होइल पामर

तीन वाजुनि दहा मिनिटें सये !
जाहलीं तरि कशी करुणा नये.
थेटरांत गरदी बहु होईल
रुष्टता न जरि सत्वर जाइल.

लेस, पातळ, पावडर क्रीम ही
स्नो, तसेच कितीतरि सेन्टही
रेशमी नवनवे किति ब्लाउझ
ऑर्डरीन † गुणिले ! तुझियास्तव.

---

* एका विख्यात नाटककाराची मूळ ओळ. प्रयोगासाठीं येथे फेरफार केला आहे. नाटक व नाटककार आणि नाटक व फेरफार यांचा अन्योन्यसंबंध कोणत्याहि नाटक कंपनीच्या हँडबिलांत रसिकांनीं पाहिलाच असेल.

† Order करीन—मागवीन—आणवीन. मूळ इंग्रजी शब्द मराठविण्याचा हा प्रयत्न आहे. —कवि.

बाले एक पारि बोल एकदां
घोळवीन मनिं तो अनेकदां
जीव हा ललने बहु श्रान्तला
शब्द एक तरि ऐकवि त्याजला.

कारि कृतार्थ मला प्रमदे ! अये !
अजुनि कां न मुखांतुनि शब्द ये
चित्तहारिणि ! कां रुसवा असा
परिसवी मधु शब्द क्षणीं कसा.

नच दया; अदया पुरि जाहली
युक्ति एक तयें मग योजिली
हलुंच मागुनि ओढुनि चुंबिली
'इश्श,' बोलालि, लाजलि, हांसली.

---

# दिवाळ सण

—— ० ——

पत्र आली घेऊन मेल गाडी
हर्ष झाला शेजारच्या बिऱ्हाडीं

वृत्त आलें ‘ येणार दिवाळीला
नविन जामात प्रथमच्या सणाला ’

सुरू झाली मग तयारीहि जारी
किती तजविजि अन् खटपटीहि भारी

कुणी ‘कोणा’ ला चिडवितें सदाही—
‘ कशी उत्कण्ठित दारांत उभी राही. ’

मित्र तैसे सोयरे सगे सारे
स्वागताच्याप्रीत्यर्थ बोलवीले

मीहि गेलों आमन्त्रिला तयांही †
स्नेहि त्यांचा मग नवल यांत नाहीं.

ठमाबाई आणखी विठाबाई
सत्यभामाबाई नि रमाबाई

अशा आळींतिल कितिक माळकाया
जमुनि आलेल्या जांवया बघाया.

योग्य वेळीं त्या पातलों गृहांत
आणि गेलों मी थेट बैठकींत

बघुनि गोरागोमटा मला सारीं
म्हणति आली ही जांवयांची स्वारी

---

† Passive Voice. त्यांच्याकडून आमंत्रिला गेलों असा अर्थ.

सासुबाई गुंतल्या फराळांत *
श्वशुर ‡ गेले होतेहि ते क्लबांत
आणि ' कोणीसें ' दडुनि बैसलें तें
कोण तेथें मग ओळखील मातें ?

वर्दि गेली जांवई येउनीयां
वेळ कितितरि जाह्ला बैसुनीयां

काय पुसतां मग तेथ उडे घाई
कुणी पाणी टॉवेल मला देई.

कुणी बोले, ' जाह्ला प्रवासांत—
त्रास भारी घ्या विसांवा निवांत '

कुणी पुसतें ' कशिं असतिं तातमाई ? '
कितिक डोकावुनि आजिबाई.

मला आली मग नशा जांवयाची
पडे विस्मृति मज काळ वेळ यांची.

तोंच आलें ' कुणि ' घेउनी फराळ
ओष्ठप्रान्तीं स्मित मञ्जु तें रसाळ

गोड येणें, चालणें गोड भारी
गोड रसना, रचनाहि गोड सारी
मधुरतेची संपूर्ण कीं खुमारी
वेंचुनीयां विधि निर्मि हो कुमारी !

कंप आला देहास विविध भाव
मनीं आले; लोपला भिन्नभाव

* फराळ करण्यांत नव्हे—फराळाचें करण्यांत. ‡ माझे नव्हे येउ घातलेल्य जांवयांचे.



तोंच आलें 'कुणि' घेउनी फराळ । ओष्ठप्रान्तीं स्मित मञ्जु तें रसाळ ॥
अतां नेत्रांनां नेत्र भेटणार............ (दिवाळसण, पृष्ठ.३२)

अतां नेत्रांना नेत्र भेटणार
तोंच टांग्यांतुनि उतरले श्वशूर. §

संगतीला जामात तयांच्या हो
(कोण तर मग हा लफंगा घरीं, हो!)

नका बोलूं मग फैर कशी होई—
'कोण मेला तोतया उभा राही!'

'किती चावट हा बाइ लोक झाला
भरा पकडा द्या पोलिसांत मेला'

कशासाठीं मग राहणें तिथें मीं!
पार सटकुनि पातलों परत धामीं.

× × ×

वृत्त कळतां हें सकळ जांवयास
हास्यऊर्मी उसळल्या मनीं त्यास
शब्द आला मज पुन्हां यावयास
परी जाणें कां योग्य?—नव्हे खास!

---

§ हे बहुधां क्लबांतून परभारां स्टेशनावर गेले असावेत.

---

# कुण्या एकीस

—:०:—

प्रेमले ! तुझ्यावर मी राजी
मग कां तर इतकी इतराजी ?
तूं तलवार माझी
मी शूर बाजी
हंसोत हंसणारे पाजी
पण नको तुझी मज इतराजी.

तूं कुराण माझें मी काजी
तूं लोल जर्मनी मी नाझी.
हिटलेर कीं
बुटलेर मी
म्हण पाहिजेल तें पारि राजी
हो सोडुनि सखये ! इतराजी.

चल् प्रेमाची नौबत पिटली
मी मसोलिनी अन् तूं इटली.
तूं पोर्शिया मी बॅसॅनिओ
तूं ज्यूलिएट् मी रोमिओ
मी वृक्षसखा अन् तूं वेली
तूं वक्रता मी मॅकिॲवेली.

या तारुण्याच्या गालिं पुळया
त्या मदनस्पर्शें होति कळ्या

नव पाकळ्या
जधिं फांकल्या
तेधवां शोभशिल पुष्यवती
नवलज्जाशील अशी युवती.

तोंवरी कशाला इतराजी
तव मुग्धतेवरी मी राजी
कोमले ! किती हांजी हांजी
करुं सोड अतां ही इतराजी.

---

# मला बाळ्या कां आवडतो ?



जरी अघाशी मुलुखाचा आणि वांड बाळ्या
रोज कानिं तक्रारी किती येति निरनिराळ्या

घरीं दांडगाई दारीं चुगलखोरि भारी
आणि शाळेमाजीं मारामारि करी जारी

तरी आवडे मज बाळ्या: एक गोष्ट छान
तयाजवळ; टाकी मम जी चित्त मोहवून

जरी किती चाळे त्याचे पाहियले डोळां—
पशू सर्व एकाठायीं जणूं होत गोळा

कधीं वडिल झोंपीं जातां मारितसे डल्ला
खिशावरी त्यांच्या; भावंडांवरि करि गिल्ला

तरी त्याजपाशीं होती एक ' वस्तु ' खास
जिच्यामुळें बाळ्या माझ्या पात्र आवडीस

रूप तयाचें कसलें तें ! – कुरुपताच पूर्ण
जाहली असे या भूवरि वाटत अवतीर्ण

नखें कुरतडणें अन् खोटें बोलणें उगाच
धर्म हाच त्याचा बनला कायमचा साच

तरी मला बाळ्या मोठा गोड पोर वाटे
एक गोष्ट त्याची मन्मनिं निस्संशय दाटे

जधीं करी माझी खोडी तदा मनीं वाटे
दोन भडकवाव्या श्रीमुखिं, परी चित्त हाटे,

कारण बाळ्याजवळी जादु एक हो कीं
जिच्यामुळें बाळ्या झाला प्रीय मला लोकीं
अशीं कोणती ती ' वस्तु. ', ' जादु, ' ' गोष्ट, ' साची–
फिरविली जिनें हो ऐशीं वृत्ति मन्मनाची ?
काय सांगु रसिका, ' केवळ चांदणी नभींची
अशि सुंदर अविवाहित तरुण बहिण त्याची '

——

# विरहिणीचे उद्गार



जगीं एकला तूं गाजी
माझा जीव तुला राजी.

दुनिया तुजवांचुनी सुनी
तुला चिन्तितें सदा मनीं
आनंदाचा
बाळपणाचा
काळ मजेचा
तुजसांगातीं कण्ठियला
हृदंतरीं तुज सांठविला

असतें जरि मी माहेरीं
धरुनि प्रेमभरें स्वकरीं
चुम्बुनि तुजला कितीतरी
कौतुक करते परोपरी
प्रातःकाळीं
मधल्यावेळीं
सायंकाळीं
ओष्ठांनीं ओढुनि घेतें
आत्मसात् तुजला करितें.

दर्शनही दुर्लभ झालें
मग येथें स्पर्शन कुठलें !

वर्ण तुझा तांबुस गोरा
' इकडे ' त्याचा तिट्कारा
लग्न होउनी
मी या सदनीं
आलें म्हणुनीं
काय तुझा हवा दावा
सकलांनी संपादावा !

चैन जिवाला नच पडतें
ध्यास कधीं दर्शन घडतें
भंवताली नणदा–जावा
जाच कसा हा सोसावा ?
वाटे चोरुनि
भेट घेउनी
तुला चुम्बुनी
जीव एकदां शमवावा
तुजसांगातीं रमवावा !

प्रेयसी जाहली लोल, प्रियसखा कोण तो पहा
वेड जो तिजला लावी—मधुर लिप्टनचा चहा !

——

# पहिलें चुम्बन !



चंचल मन जें भाव कोंवळे ओष्ठपुटांवर लिहितें
पहिले चुम्बन तुझें ठळकसें मोर्तब त्यावरि करितें

शुभ्र वस्त्र परिधान करोनी आलिस नाजुक नार
प्रथमदर्शनीं प्रथम दिनीं मी लज्जित झालें फार

अधोवदन जाहलों परि तुला धरिली सव्य करानें
आणि पाहुनी इकडे तिकडे चुम्बियली अधरानें

काम रसरसें सर्वांगीं तें मस्तक झालें सुन्न
कांहीं न सुचे कांहीं न रुचे भाव लोपले भिन्न

अधिकाधिक तव परिचय होतां लज्जा गेलो पार
आणिक बनलों दिसंदिस मी दास तुझा लाचार

आतां तर वर्णणें कठिण जी स्थिती जाहली दीन
रात्रंदिन तुज वांचुनि सखये ! जिवास न पडे चैन

खुशाल धरुनी करीं हिंडतों दिवसाढवळ्या मार्गीं
जन जरि कांहीं वदले तरिही पर्वा त्याची नाहीं

तुझ्यासंगतीं जीवितयात्रा सुखकर होइल साची
अशीच पटली प्रथम चुम्बनीं खूणहि विश्वासाची

सतत चुम्बनें ओष्ठद्वयांचा रंग गुलाबी गेला
आणि काळसर ठसा तुझ्या सखि ! प्रेमाचा अवतरला.

मदीय सौख्यास्तव तूं झटतां रक्षा करुनी घेसी—
निज देहाची परी दुज्याक्षणीं नवरूपें अवतरसी.

जुनीं पुराणीं किती चुम्बनें चुम्बुनि तुजला झालीं
तरी वाटतें मज पहिल्याची मधुता लव नच गेली
प्रथम चुम्बना शद्बीं गातां शिणेल वाणी खास
त्यासच कळणें ज्यास विडीचा † ध्यास असे हमखास!

---

† हे सुंदरि! तिसऱ्या ओळींतील 'शुभ्रवस्त्र' तूं सिगारेटच्या रूपांत असतांनाचें आहे हें रसिकांस सांगावयास पाहिजे काय?—कवि



# शारदा कीं मृच्छकटिक ?

" श्रीप्रासादिक स्त्रीविभूषित चलद्भ्रूभारिणी संगित "
होती " नाटक कम्पनी " बहुपरी विख्यात लोकांप्रत
सारा संच सुरेखही नटनटीसंमिश्रणें जाहला
नाट्योत्कर्षगुणें समस्त जनही मोहून विश्रामला.
गाजे नाटक ' शारदा ' दशादिशां ते हातखंडें असें
तैसें ' मृच्छकटीक ' ही ' बसविलें ' बिनूतोड तेंही तसें
मद्ग्रामीं गुणवान् अशी नटनटींची मंडळी पातली
उत्साहास सुमार नाहिं—जनता संपूर्ण वेडावली.
तट्टे, बांबु जुळून ' थेटर ' उभें झक्कास तें जाहलें
टोलेजंग इमारती शहरचें ‡ खेड्यामध्यें कोठले ?
गेलों एक दिनीं † प्रयोग बघण्या संगीत मी ' शारदा '
आली एक घडोनि दैवघटना जी केवला आपदा.
होता चालत तो प्रवेश वधुला पाहावया पातले
जैं श्रीमन्त भुजंगनाथ बहिरे तों नाट्यही रंगलें.

---

‡ ' शहरचें इमारती ' असें हेंगाडी व्याकरणरूप कवि कधींतरी करील काय ? नाहीं. तर इमारती हें विशेषण समजून पुढें ' थेटर ' हें अध्याहृत समजावयाचें.

† रात्रीं. मुंबई–पुण्याव्यतिरिक्त इतर ठिकाणच्या वाचकांनीं याचा अर्थ रात्रीं असा समजावयाचा. कारणं या दोन ठिकाणचा अपवाद सोडून दिल्यास इतरत्र नाट्यप्रयोग ' रात्रौ ' होत असतात.

तों ये वृष्टि करीत मेघ वरतीं तट्टे उडाले पुरे
मेघांनीं मग रंगभूमि अवघी संसिक्त केली त्वरें

तेव्हां संभ्रमली पुरी गुणनटी पाहोनि ही आपदा
'श्रीमन्ता 'सच 'चारुदत्त ' गणुनी आलिंगिते * शारदा '

---

* यापुढें 'श्रीमन्तां' नीं 'अंगें भिजलीं जलधारांनी' या पदानें बहार करून सोडली; परंतु मंडप कडाडल्यानें टाळयांचा कडकडाट ऐकूं आला नाहीं. व 'वन्समोअर' ऐवजीं सर्वच 'नोमोअर' झालें.—कवि.



# बाळयाच्या.... ?

—:०:—

" एक सोडिली, दुसरी धरिली नंतर तिसरीवरी फिदा
ती झाल्यावर चवथी आली असा चालला खेळ सदा.
नाहीं बाई बघवत डोळां बाळयाचा असला नाच
इतक्या करुनी पुन्हां आपला आहे तेथें आहेच."

*　　　*　　　*　　　*

" उतास आलें वयही म्हणुनी शोधुनि एक बरी दिधली
तिला सोडुनी दुजी पाहिली तरि नाराजी नच गेली.
तिसरीसाठीं तडफड करतो, टिकेल कां परि ही भीति
सदा जाचिते मनास माझ्या; मिळेल कोठें मग चवथी ?'

*　　　*　　　*　　　*

एकीमागुनि एक सारख्या कितीक या वरिसी, बाळया ?
तुझ्या सुखास्तव रक्षा झाली त्यांची तरि न मना आल्या.
सतीपणाची तयां लाभली पुण्याई मजला वाटे
परी तुझा हव्यास नव्यांचा अजुनि न कां बाळया आटे."

*　　　*　　　*　　　*

मातापितासुहृद् यांचे असे उद्गार वाचुनी
वाचका ! वाटु दे न मनीं—" बाळया राक्षस कां कुणी "
नाडिल्या कुणि ना नारी एकीमागुनि एकही
शाळा, चाकरि, सिगारेट ऐशा या युवती तिन्ही.

——

# सोन्या सारं कांहीं बोलतो !

सोन्याचं § वय वर्ष एक अथवा थोडें अधीक ‡ असे
'आ आ' वांचुनि शद्ब त्या न दुसरा बोलावया येतसे.

मातेच्या परि स्नेहपूर्ण हृदया सारेंच न्यारें दिसे
सोन्याला तर सर्व कांहिं वदतां वाटे तिला येतसे.

पापा घेउनि एक त्यास म्हणते 'आई' मला बोलरे !
'आ आ–आ' मुख वांसुनी वदतसे हर्षोनि सोन्या स्वरें

"बाई, बाळ गुणी किती तरि असे 'आई' असें बोलला.
आतां सोनुकल्या तसेंच वदरे तें नाम 'त्यांचें' मला"

"आ–आ" गर्वभरें करोनि बघतो सोन्या स्वमातेकडे
"कैसें नाव वदे अचूक" वदली "आहे जरी वांकडें."

"सोन्या हे झबुराव येथ बसले घे नांव त्यांचें बरें !"
'आ—आ' फांकुनि ओष्ठ बाळ वदलें मन्नाम तें साजरें.

"पाह्यंलत् ना झबुराव नांव तुमचें चटकन् कसें सांगतो !
जें जें बाइ ! तया विचारिल कुणी तें सर्वही बोलतो !"

मातेच्या हृदयास काय न दिसे ?—मातें मनीं वाटलें
शद्बब्रह्म समस्त भासत तिला सोन्यांत सामावलें !

---

§ सोनं नव्हे सोन्या—कवीच्या शेजाऱ्याचा मुलगा. ‡ 'क' वर जोर द्या म्हणजे गण चुकणार नाहीं.

# मी कोण ?

तीस दिवस वाट बघत रात्रंदिन झुरत असे
प्राणिमात्र ज्यासाठीं कोण असा तो मि § असें ?

एक दिवस मी येतां जीवकळी उमलतसे
अन् चटकन् जातां मी नूर पुरा उतरतसे.

वाणी, उदमी, परीट, मोलकरिण, घरवाले
हे सारे मजवरतीं विसम्बून राहियले.

'पहिली'ला मी येतां नित्य–उदासीन–प्रिया
आज मात्र दन्तपंक्ति दावितसे पूर्णतया.

बाबू, मधु, पांडु, बंडु, धोंडु मथी, यमी ठमी
आणि इसर डझनवार–विसरलोंच नामें मी !

हीं सारीं एकत्रित होउनियां मम धन्यास
एकच गिल्ला करुनी नको जीव करिति त्यास

कारण पाटी, दऊत आणि दुध्या पेणसिली
हीं सारीं मजवांचुनि महिनाभर खोळंबलिं !

कितिक सावकार नष्ट, खाष्ट इतर दिनिं भारी
आज मात्र पूर्ण त्यांचि बघुनि घ्यावि लाचारी !

फेंकुनियां मज त्यांच्या तोंडावर चुप्प करी
धनि उदार कर्ण जणूं ते केवळ जणुं भिकारि.

आज काल या लोकीं ज्यावरि सारी मदार
तोच असे एकमात्र महिन्याचा मी 'पगार'

---

§ मी. यालाच Poetic License म्हणतात. "अरेरे, हेंही सांगावें लागतें !"

# तेव्हां आणि आतां

## अर्थात् आधुनिक सासूचें गाणें अथवा रडगाणें !

किती बोलणीं टोंचणीं साहिलीं म्या विषाची कुपी कीं जणूं प्राशिली
नाहीं परंतु कधींही चुकोनी वचें सामुला मी जनीं निंदिलें.
किती उस्तवाऱ्या बहू कष्ट केले, किती गालगुचे नि लत्ता किती
किती मार पाठीं, किती डाग हार्ती, किती सोशिलें त्यास नाहीं मित
किती आळ खोटे नि आरोप मोठे तसा आळ दुर्नीतिचा सोशिला
नाहीं परंतू कधींही मुखानें बयेला कसा बोल मी लाविला
सैंपाक सारा, सडा केरवारा, दरारा तिचा पाहुनी आंवरी
मी एकली रांधिलें पाहुणे पांच पन्नास पन्नास आले जरी
हे सोशिलें सर्व एका जिवीं जी सदा रोंखली त्याच आशेवरी
" काढीन याचा पुरेपूर वचपा पुढें मागुतीं मी सुनेच्यावरी ! "
नाहीं परी ती पुरी आस झाली, जनाची गती जाहली पालटी
फाटेल झाला पुरा पोर माझाच भाळे तिला—अव्दसा गोमटी
माझ्या समोरी हंसे बोलते त्याजसंगें भवानी कशी कारटी
सभेमाजिं गाई, फिरायास जाई न सोडीत पळही तयाला सटी
तिला बोलतां मी तिचा पक्ष घेई मला सारुनी बाजुला कारटा
त्यांचा परी कायदा हा निराळा—बयेसाठिं मज मारतां मारतां
करी कामधंदा जरीही मुळींही मला त्रास नाहीं घडीचा परी.
समाधान नाहीं तरी मन्मनाला सुनेला छळाया न लाभे जरी.
देती बरें खावयला पुरेंसें तसें वस्त्रही जें न लाभे मला
जरी पूर्वकाळीं तरी त्या सुखाचें मुळीं मोल कांहीं न वाटे मला.

सासूपणाची खरी जी मजा कीं सुनेला खरा जाच द्यावा जरी
किती चांगली ती असो ही न माझी पुरी होत इच्छाच केव्हांतरी

देवा ! पुरे हाल माझाच झाला जरी दाम खोटा तरी बोलणें
कोणी कुणाला वृथा आजकाळीं नको जाहलें हें अभागी जिणें
तेव्हांचे दिवस भाग्याचे सास्वांनीं भोगिले पुरे
आतां मी असतां सासू—सासुत्त्वच्च * जगीं नुरे !

---

* संस्कृतांतून प्राकृत अवतरलें असें म्हणतात. हल्लींचा काळ उलटा आहे असें वरील सासू म्हणत आहे. त्या आधारें हें प्राकृताचें संस्कृत मी बनविलें आहे. शिवाय ‘ निरंकुशाः कवयः ’ हा आधार आहेच.—कवि.





..................कसलें भांडण करतां?
पानसुपारी खाउनि बुडवूं प्रसजलीं तें आतां
चंचीवटवा प्रथम मांडलीं ..................
(समेट, पृष्ठ ५१)

# देवपूजा

तुळ्सी, बिल्वदलें, फुलें विविधशीं तैसेच दूर्वाङ्कुर
हळ्दी कुंकु, अबीर, कर्पुर तशा गंधाक्षता, चौसर
यांही पूर्ण भरोनिया तबक तें चिक्कार ठेवीयलें
बापूरावजि नेसुनीहि मुकटा देवापुढें बैसले.
बाजूलाच तिथें धडाडत असे ती चुल्लिकासुंदरी
बैसे तेथ समोर पाककुशला भार्या तयांची बरी
वस्त्रें देव पुशीत बापु बसले तों उग्रसा वास ये
वरणाची करपून डाळ सगळी भांड्यांत रक्षा उरे.
" कां तूं ऐशि अजागळासम तुवां ' सैंपाक ' पाहूं नये ? "
ऐसें बोलुनि बाळकृष्ण पुजिला वाहोनि पुष्पें दळे.
आतां जों जुंपणार भांडण अकस्मात् तों * तिथें पातले
राजश्री हणमंतपंत बगळे मुल्की हपीसांतले
" या या, पंत बसा असे-झडकरीं दे पाट गे त्यांजला—
कैसें काय ? हवा, हकीकत कशी बोला त्वरेनें मला
कां हो व्हाइसरायची व्हिजिट ती यंदांहि गेली दुरी ?
प्लेगाचाहि कहार काय अजुनी आहेच कोल्हापुरीं ?
कज्जाचें मम काय काय करिती श्रीन्यायमूर्ती तरी ?
शेरा काय मिळे दिवाण हपिसामधल्याहि कामावरी ? "

---

* ' अकस्मात्तों ' असें लिहूं काय ?—पण नको. वाचतांना तसा प्रयोग होणारच आहे !

रंगोनी मग पूर्ण मित्रद्वय तें संभाषणाभ्यंतरीं
ऑटोमॅटिकलीच देव पुजिला एकेक जाई करीं.

पाहोनी कवि हा प्रकार थिजला अन् थक्कलासे § मनीं
सारें कांहिं तिथें यथास्थित दिसे—एकाग्रतेवांचुनी !

थट्टेची देवपूजा वा थट्टा देवपूजेची ?
विचारा जा तयांनांच ज्यांस ही संवय रोजची.

---

§ थक्क झाला. थकला किंवा दमला नव्हे. -कवि.

—

# कृपणाचें गाणें.



('एकच प्याल्यां'तील 'वेध तुझा लागे' या पदावरून सुचलेली कल्पना.)

वेध तुझा लागे सतत money !
वसतिस राही नाणें वदनीं
जगत् सकल मज भासत त्वन्मय
मधुर ध्वनि तव खेळे कानीं !

———

# ?

[ सुप्रसिद्ध वादनपटू गोविंदराव टेंबे यांच्या 'कोण कोठोनि आली' या नितांतमधुर गीताचें विडंबन ]

कोण कोठें निघाली कुरामा
कुण्या धामा ?
कपटपटु ती तिचि चाल किती वामा
नाहिं सीमा.
रात्र बहुत झाली, लपतछपत गेली
पावली नच पथीं क्षण विरामा
हे ‡ पापकामा !

‡ स्त्रीलिंगी 'ही' या अर्थी 'हें' वापरण्याचा जुन्या कवींचा प्रघात आहे. त्याच अर्थानें 'हे'ही ही समजावयाची.

# कधीं ?

पात्रपटावरि विविध चवीच्या पाककृती या परोपरी
मुखीं कधीं पडणार परी ?

नाकाला आनंद देति हे पक्वान्नांचे वास खरे
पुढ्यांत कधि येणार बरें ?

आंबट आंबट गोड कढी ही मन ओढे रायत्याकडे
कधीं परी पानांत पडे ?

चळत पुरीची देई थारा त्या चकचकत्या वशोमधीं
तोंण्डीं पारि जाणार कधीं ?

झांपड पडते डोळयांवरती—क्षुधा पेटतांना उदरीं;
आग कधीं शमणार परी ?

प्रतिरात्रीं हीं स्वप्नें दिसतीं इच्छाभोजनचित्रांचीं;
सृष्टि कधीं होइल त्यांची ?

अंधनयनिं ही बघते आशा विश्वचि हें जिलब्याकार †
पोटिं कधीं अवतरणार ?

श्रीखण्डाची दाट केशरी सृष्टि पसरली ही इकडे
कधिं भुरका हातून घडे ?

आणि बल्लवा ! दिलीस वचनें; चोरुनि जिन्नस कितीतरी
देइन; पारि देणार कधीं ?

भोजनभास्कर जें जें वाञ्छिल ताटीं आणिक वाटिमधीं
पडेल तें तें सांग कधीं ?

---

† जिलबी + आकार. संधीरूलसाठीं पहा— डॉ. भांडारकर यांचें संस्कृत पहिलें पुस्तक. —कवि.

# विरामचिन्हें !

—:०:—

जेव्हां जीवनलेखनास जगतीं प्रारंभ मी मांडिला
जो जो दृष्टित ये पदार्थ सहजीं वाटे हवासा मला
बर्फीचा तुकडा, खमंग चिवडा, मासे तसे बांगडे
तेव्हां स्वल्पविराम मात्र विविधा वस्तूवरी बागडे.

आहे काय डब्यांत ! त्या फळिवरी हें काय हें ठेविलें !
शाळा मी चुकवूं कशी न कळतां आईस, चिन्ता पडे.
कोणी पाहिल काय ? हें बघतसें दृक् संशयें टाकित
सारा जीवनलेख मी करितसें तें प्रश्नचिन्हांकित.

अर्धांगी पुढतीं प्रवेश करि ता नानाप्रकारें नटे
सारें जीवन व्यर्थ होइल इथें साक्षी मनाची पटे.
कसचें प्रेम नि, काय सांगत असा, होतो सदा भांडणें
अर्धा जीव बने सळूनि * पळुनो वाटे जळो हें जिणें.

देवा ! हें कसलें उगाच लफडं मत्पाठिशीं § लाविलें !
केला अर्धविराम तेथ; पुढतीं चौफेर मी पाहिलें.
सारा लोक मला हंसे म्हणतसे ठोंब्या कसा राहि हा
नाहीं लेखन—वाचनीं मति मुळीं ऐसा अडाणी महा.

लोकोद्गार असे खरे परिसुनी भांबावलों मी क्षण
तेव्हां मूढ बने तसें सहजची उद्गारवाची मन.

---

* 'तिनें मला सळो कीं पळो केलें तेव्हां' असा अर्थ.

§ माझ्या पाठीशीं. गंगाजम्नी समास. व्याकरणांत न सांपडणाऱ्या समासाला गंगाजम्नी समास म्हणतात. —कवि.

ग्रादे, अंक, नवीन शब्द अथवा कांहीं मला येइना
पत्नी, मित्र, सगे, जगांत अवघे कोणी मला मानिना.

अर्धस्वल्पविराम, प्रश्न अथवा उद्गार यांचा भला
सर्वांचा परमोच्च संगम चिरं जेथें असे जाहला—
( तेथें पूर्णविराम देउनि मला आतां सुखें राहुं दे. )
देवा ! तें मन खुद्धलेखन तरी आतां पुरें येउं दे !

---

# गड्या ! खरें बोल.

आव आणिसी विद्वत्तेचा बाताही लंब्या चवड्या
ठोकुनि देसी परि संपादक ! काय येतसे तुला गड्या ?
आव आणिसी लेखनावरी टक्के करितो इवेतसे
परी लेखका ! खरें सांग रें उपास करिसी कितीकसे.

आणि कवे ! तूं अमृतपानीं दंग सदा होउनि जासी
परि इहलोकीं खरें सांग ना महाग आंबटवरणासी.

जीभ झडविसी सदा बोलुनी सचोटिचा धंदा माझा
परि व्यापाऱ्या, सचोटीवरी किती खरा व्यापार तुझा !

न्यायदेवतेच्या कार्यी तूं तत्पर वकिला, कांतं अशी
किती खऱ्याचें खोटें केलें खोटेंहि खरें भासविसी.

आटापेटा तुझ्या जिवाचा अमुच्या झोपेरांकरतां
परि विमाएजंटा, तुजला तुझ्याच पोटाची चिंता
भिषग्वरा ! तूं जीवितदानीं महापुण्य पदरीं घेसी
खोट्या सर्टिफिकीटावरतीं किती मढीं गाडुनि देसी ?

पातिव्रत्यावरी झोडितां व्याख्यानें सव्वा हात
कुठें परी पत्नीव्रत तुमचें ! दडलें गणिकामहालांत !

आणि पुढाऱ्या देसी झोंकुनि अव्वाच्या सव्वा गप्पा
स्वराज्यनामें सार्वजनिक तूं फंडाचा करिसी सप्पा.

सामाजिक, राजकीय, औद्योगिक कार्यास्तव अवतरलीं
अशीं मासिकें अकरा महिने राहतात गळोगळीं

पारे बाराव्या महिन्यामध्यें काळें करूनी कायमचें,
राष्ट्रोद्योगसमाजहिताचे बारावें उरकिति सार्चे.

आणि नटाला कशास बोलूं बोलुनि चालुनि तो खोटा
अभिनय नाहीं तरि नट होई; कंपन्यांस नाही तोटा.

सावकार अन् समाजसेवक, धर्मवीर असले बेटे
किती घालिती धुमाकूळ जगिं विचार करतां मति हाटे.

* * * *

असा स्वार्थ हा जिकडे तिकड बोकाळुनि गेला जगतीं
कृत्रिमतेच्या फोलकटावर जगुनी प्रौढी मिरवीती.

स्वार्थापायीं झाली ज्याच्या ससाराचीही राका
आपलपोट्या जगीं खेद हा तापवितो त्या संराका.

खंत वाटली तोंच महात्मा * दिसे उभा डोळ्यांपुढती
धीर वाटला, दिव्य प्रेषिता § आशाही दाटे चित्तीं.

---

* म. गांधी. § पहिली टीप पहा.

# धावा यमरायाचा *



धांव रे यमराया । किती अन्त पाहसी ! †
आक्रान्त मांडियेला । नये करुणा कैसी

अन्तक हें नाम घेसी । कां न नवसाला पावसी !
घरोघरीं झाले कवी । त्यांची निपज थांबवी

पांढऱ्यावर करतां काळें । झाले काळ्याचे पांढरे
ऐसी रीती कितीकांची । नीती कवी सज्जनांची (!)

वेगळाल्या मासिकांत । एक मात्र कविता येत
केवळ हेडिंगे बदलणें । हेंच यांचे अवघें जोणें

कधीं चोरी दुसऱ्याची । कधीं मखलाशी स्वतःची
कधीं जुन्याच मालाला । कोणी दनातो उजाळा

नग घेवोनीयां हातीं । कवि बाजारीं फिरतीं
कोणी चालक मालक । मासिकाचा संपादक

घेतो सस्त्याचा हा माल । छपाईचा हो कमाल
बॉर्डरीची वेषभूषा । कृत्रिमाची अवघी भाषा

जणूं सजलेला हमाल । सिंहासनी हा भूपाल
यांचा पाहुनीयां मेळा । अर्जी शब्दार्थ बदलला

---

* या कवितेंत " मात्रादोष अगदीं अपरिहार्य आहे. "

† ही ओळ यमरायाच्या बाबतीत निरनिराळ्या अर्थांनीं खरी नाही असे म्हणण्याची कोणाची छाती आहे ! —कवि.

कवी म्हणजे झाली शिवी । पार मूलार्थ लोपवी
शारदेच्या मंदिरांत । चाले कीर्तीची खैरात

तिच्यासाठीं ही कोडगीं । जमली बाजारबुणगीं
असल्या नकल्यापुढें व्हावा । अस्सलांचा कोण केवा

देवा धांवा आतां धांवा । दूत आपले पाठवा

* * *

एक विनंती राहीली । जरी मी ही कविता केली
तरी न म्हणावितों कवी । ( कोण पत्करील शिवी ! )
म्हणुनी प्रार्थितों जगदारे ! । वेळ नको माझ्या घरीं.

---

# हीं फुलें कुठलीं ?

यंत्र भेदुनि नाद पाहूं नये। —तुकाराम.

[बागेतील एका कुंजांतील आसनाजवळ कांहीं फुलें पडलेली एका रसिकास आढळलीं. त्यावरून तेथें एखादी रम्य प्रेमकथा घडलेली असावी अशी कल्पना करून ती ऐकावी या उत्सुकतेनें त्यानें बागवानास विचारले असतां त्यानें जें उत्तर दिलें त्यामुळें रसिकास वरील तुकाराम आठवला!]

तरुणिमा जिची बहरली अशी सुंदरी इथें बैसली
तिची ही खूण काय उमटली !

वाट पाहुनी शिणली तेव्हां विरहाश्रू वाहिले
तेच हे पुष्परूप राहिले !

उत्कंठेनें मार्गप्रतीक्षा करित इथुनि चालली
तिचीं हीं पाउलेंच उमटलीं

अनुपम लावण्याला भुलुनी नक्षत्रें लाजलीं
तिच्या पदिं फुलें बनुनि लोळलीं !

प्रियकर येतां तयास ती जीं कटु [illegible] बोलली
तींच हीं इथें [illegible] राहिलीं !

प्रेमकथा ऐकवीत सखिला [illegible]णानें माळिलीं
फुलें, हीं शेष काय त्यांतलीं !

प्रेमगुंजनीं रमतां रमतां ओष्ठमधू चाखिला
गळलि ती काय चुम्बनावलि !

आणि शेवटीं समेट होतां रमणि-वल्लभांचा
रुसवा मागें हा त्यांचा—

ठेवुनि गेलो—अशी असावी प्रणयि-प्रणयिनीकथा
कदापि होइल ना अन्यथा

प्रणयचेष्टितें गोड अशिं जयें चोरुनियां पाहिलीं
खरा तो भाग्यवान् महितलीं

बागेवरला दारवान बहु भाग्यवान् गमतसे
रोज नवि प्रेमसृष्टि बघतसे

चला पुसावें त्याला म्हणुनी रसिक धांवला त्वरें
म्हणे, " हीं फुलें कोठलीं बरें ! "

*            *            *            *

" कंची म्हन्तां ! हीं व्हय् ? दादा, चार कारटीं भलीं
चारुनी बागेंतुनि चाललीं.

बघुनी माझा सोटा त्यांनीं पळतांना टाकिलीं
कालपुन तींच इथें राहिलीं "

